# नवभारत

एप्रिल - २०१५



* एक सत्य (?) कथा
* फ्रान्सिस फुकुयामा यांचा 'इतिहासाचा शेवट'
* गौडीय संप्रदायातील प्रेम - एक अनमोल सिद्धान्त
* सं. मानापमान - सौभद्रचे संयुक्त प्रयोग आणि मराठी रंगभूमी
* पुस्तक परीक्षण : 'नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य - मौलिक संशोधन'
* वाचकांचा पत्रव्यवहार : बाबूराव चंदावार



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

---

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८। अंक ७। एप्रिल २०१५
चैत्र/वैशाख शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## एप्रिल २०१५

## अनुक्रमणिका


- **एक सत्य (?) कथा** ४
  इरावती कर्वे
- **फ्रान्सिस फुकुयामा यांचा 'इतिहासाचा शेवट'** ११
  अशोक कृष्णाजी जोशी
- **गौडीय संप्रदायातील प्रेम - एक अनमोल सिद्धान्त** २१
  रोहन वेंगुर्लेकर
- **सं. मानापमान - सौभद्रचे संयुक्त प्रयोग आणि मराठी रंगभूमी** २७
  मेधा सिधये
- **पुस्तक परीक्षण : 'नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य - मौलिक संशोधन'** ३३
  पंडितराव पवार
- **वाचकांचा पत्रव्यवहार :** ३८
  **बाबूराव चंदावार**

## प्रास्ताविक : अप्रकाशित इरावती

डॉ. इरावती कर्वे यांच्याविषयीचा समग्र अभ्यास २००० मध्ये परिपूर्ण करून मी पुणे विद्यापीठाला "डॉ. इरावती कर्वे : व्यक्ती आणि वाङ्मय" हा माझा प्रबंध सादर केला. नऊ ऑक्टोबर २००० ला मला पीएच्. डी. पदवीही त्या निमित्ताने मिळाली. २००५ हे इरावतींचे जन्म-शताब्दीचे वर्ष! त्याचे औचित्य साधून मी "डॉ. इरावती कर्वे : व्यक्ती आणि वाङ्मय" या पुस्तकाद्वारे त्यांना मानाचा मुजरा दिला. प्रकाशक होते, अरुण जाखडे – पद्‌गंधा प्रकाशन. मी केलेल्या अभ्यासानंतर इरावती मला मनापासून भावल्या होत्या. एवढ्या मोठ्या समाजशास्त्रज्ञ, जागतिक कीर्तीच्या मानवशास्त्रज्ञ, मराठी व भारतीय संस्कृतीच्या डोळस अभ्यासक, ललितगद्यामध्ये स्वतःचे निशाण अग्रक्रमाने डौलाने फडकवणाऱ्या अशो त्यांची अनेकविध रूपे मनाला भुरळ घालत होती. इरावतींची "युगान्त " मधली सर्वच व्यक्तिचित्रे वाचताना "माणूस" म्हणून त्या त्या व्यक्तींचा त्या किती खोलवर विचार करतात, हे प्रत्ययास आले होते, त्यांचे सारे असंगृहित लेखही मी मिळविले. माझ्या प्रबंधाची एक प्रत घेऊन त्यांच्या सुकन्या सौ. जाई निंबकर यांच्याकडे मी फलटणला गेले होते. तोपर्यंत इरावतींचे हस्ताक्षर मला बघायला मिळाले नव्हते. त्या वेळी जाईताईंनी इरावतींच्या हस्ताक्षरातील सोळा पृष्ठांच्या अप्रकाशित लेखाची एक झेरॉक्स प्रत मला दिली. त्यातील संदर्भांचा उल्लेख मी माझ्या पुस्तकात केलेला आहे. पण नेहमी मनात येते की, एवढा मोठा सोळा पृष्ठांचा लेख ज्या अर्थी इरावतींनी लिहून ठेवला आहे, त्या अर्थी तो लेख प्रकाशित व्हावा, ही त्यांची इच्छा असावी.

डॉ. इरावती कर्वे ह्या मोठ्या विदुषी होत्या. त्यांच्या सर्व ललितलेखनाला चिंतनाची किनार आहे. पण त्या तितक्याच हळुवार मनाच्या भावोत्कटही आहेत. म्हणून तर जन्मांतरीची भेट मध्ये "तू ती मीच का?" सारखे लेख त्या लिहू शकल्या. डेक्कन कॉलेजमध्ये स्वतःच्या विभागाच्या त्या स्वतः विभागप्रमुख म्हणून सतत राहिल्याने दुसऱ्याची पदोन्नती थांबली आहे, हे त्यांना समजत होते. पण अंगावर घेतलेल्या जबाबदाऱ्या व संशोधनवृत्ती त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. या संशोधनकार्यापायी त्यांनी त्यांच्या काही विरोधी सहकाऱ्यांकडून असहकार सहन केला. ही ज्ञाननिष्ठा कौतुकास्पद आहे. आपल्याच सहकाऱ्यावर टीका करणे, त्यांचा नामोल्लेख करणे त्यांच्या आदर्श प्राध्यापकीय व्यक्तिमत्त्वाला उचित वाटले नसावे. परंतु स्वतःच्या विद्यार्थ्यावर (जो विद्यार्थी पुढे त्यांचा सहकारी झाला) – म्हणजेच मल्होत्रांवर– झालेल्या अन्यायाबाबत त्यांचे मन स्वस्थ बसू देईना. मल्होत्रांची बाजू न्याय्य असूनही मल्होत्रांना आपण संरक्षण देऊ शकलो नाही, ही रुखरुख शेवटपर्यंत इरावतींच्या मनात होती. त्या वेळी त्यांना भेटणाऱ्या लोकांजवळ हा विषय त्या सविस्तर बोलत असत. शिक्षणक्षेत्रात उबग आणणारे राजकारण खेळले गेले, याचा त्यांना विषाद वाटत होता. त्या स्वतः मनस्विनी असल्यामुळे त्या मानसिक त्रास करून घेत होत्या. घरातील लोकांना त्यांचा हा त्रास बघवत नव्हता. आई या प्रकरणाचा नको तेवढा बाऊ करीत आहे, असे मुलगा म्हणू लागला. स्वतःच्या मनाचा क्षोभ शमविण्यासाठी हा लेख लिहिला गेला असावा. इरावतींचे लेखन आणि त्यांचे आयुष्य हातात हात घालून चालताना दिसते असे जे एक निरीक्षण आहे, त्याला या अप्रकाशित लेखानेही दुजोरा मिळतो. हा लेख लिहून एका सत्यकथेला लिखित स्वरूपात त्यांनी वाचा फोडलेली आहे, हे या लेखाचे महत्त्व आहे. म्हणून तो लेखच आपणाकडे पाठवीत आहे.

संपादक : - डॉ. सौ. उषाताई कोटबागी.

अनुक्रमणिका

# एक सत्य (?) कथा

इरावती कर्वे

मी सांगणार आहे ते मला सत्य वाटते आहे. पण गेल्या काही महिन्यांतल्या घटनांनी मन इतके गोंधळून गेले आहे की, सत्य काय, असत्य काय, चांगले काय, वाईट काय, ह्याबद्दलच्या माझ्या कल्पना चुकीच्या आहेत की काय, असे वाटू लागले आहे. माझी समजूत बरोबर असे तर अजूनही वाटते; पण त्याबरोबरच हेही प्रत्ययास आले आहे की, बऱ्याच तरुण मंडळींना तसे वाटत नाही. काय घटना घडल्या तेच सांगते; म्हणजे माझी अशी अवस्था का व्हावी, हे कळेल.

आजची घटना म्हणून सांगायला सुरुवात करावी तर कळते की, तो प्रसंग घडायला सुरुवात कित्येक महिन्यांपूर्वी, नव्हे, कित्येक वर्षांपूर्वी झालेली आहे. म्हणजे थोड्याफार इतिहासात शिरावे लागते. अगदी नाइलाज म्हणून शिरावे लागते.

आपल्याबद्दल म्हणून सांगायला जावे तर समजते की, सर्व घटना ही अगदी निरनिराळ्या व्यक्तींच्या संबंधातून व कृतीतून जन्माला आलेली आहे. ही घटना घडेपर्यंत त्या व्यक्तींचा व त्यांच्या कृतींचा अशा एका प्रसंगाशी संबंध जडेल, ही कल्पनाही मनाला नसते. नव्हे, दुसऱ्या कोणी असे प्रसंग सांगितले असते, तर केवळ कल्पितच नव्हे तर अशक्य कोटीतले मी गणले असते. माझे मन गोंधळून जायला हेही एक कारण म्हणता येईल.

सुरुवात कोठे करावी? कुणापासून करावी? दहा वर्षांपूर्वी की पंधरा वर्षांपूर्वी? एका विद्यार्थिनीपासून की एका सहाध्यापकापासून? आता ह्या क्षणाला मला घडलेल्या घटनांच्या बुडाशी तीन मुख्य प्रवाह व घटना दिसत आहेत. शक्य ते करून एक एक धागा घेऊन सुसंगत रीतीने सांगण्याचा प्रयत्न करते.

सोळा-सतरा वर्षांपूर्वी माझी एक विद्यार्थिनी पहिल्या वर्गात परीक्षा पास झाली. तिला आमच्या कॉलेजात एक लहानशी (१०० रुपयांची) शिष्यवृत्ती देऊन तिने पुढे माझ्या हाताखाली काम करून पुढची परीक्षा द्यावी, असे वाटत होते. त्याच वेळी "पुण्याला पुढे काही काम मिळण्याची आशा नाही. त्यापेक्षा गुजरातेत नवी युनिव्हर्सिटी निघते आहे तेथे आलीस तर थोडी स्कॉलरशिप किंवा एखादी मदतनिसाची जागा मिळेल; पुढची परीक्षाही देता येईल व पुढे लेक्चरर म्हणून नेमणूक होण्याचाही संभव आहे", असे एका अध्यापकाने सांगितले. विद्यार्थिनीने माझ्याकडे येऊन ह्या सर्व गोष्टी मला सांगितल्या. त्या सर्व खऱ्याच होत्या. "तुला हवे असेल तसे कर", असे मी सांगितले. ती गुजरातेत गेली. काही वर्षांनी आपल्या प्राध्यापकांशी काही गैरसमज झाल्यामुळे ही विद्यार्थिनी पुण्यास माझ्याकडे आली व डेक्कन कॉलेजातच राहण्याची व्यवस्था झाली. तिचा Ph. D. चा निबंध मी तिच्याकडून लिहून घेतला. तिचे प्राध्यापक माझे चांगले मित्र होते. त्यांना तिचा प्रबंध स्वीकारून त्यांच्या युनिव्हर्सिटीच्या वतीने परीक्षकांकडे पाठवण्याची विनंती मी केली. प्रबंधाचे सर्व काम व बरेचसे लिखाण त्यांच्या देखरेखीखालीच झालेले होते. त्यांनीही मोठ्या मनाने विनंती मान्य केली. विद्यार्थिनी परत गुजरातेत गेली. पास झाली व लेक्चररही झाली. काही वर्षांनी तेथील एक नवे प्राध्यापक दिल्लीला गेले. ही हुशार. "इथे तुझे काय चीज होणार? तू दिल्लीला चल", म्हणून त्यांनी तिला दिल्लीला लेक्चरर म्हणून नेले. काही महिन्यांत या प्राध्यापकांशी पटत नाही म्हणून अगदी टर्म चालू असताना हो मुलगी निघून परत पुण्याला माईंकडे (म्हणजे माझ्याकडे) आली. काय गैरसमज झाला वगैरे गोष्टी पूर्वीप्रमाणे ह्या वेळीही मी विचारल्या नाहीत. तिने परदेशी स्कॉलरशिपसाठी अर्ज केले. त्या सर्वांत तिला मी मदत केली व ती एका स्कॉलरशिपवर गेली. तीन वर्षांनी परत आली. तिला हिंदुस्थान सरकारने रु. ५०० वर नेमले. ह्या नेमणुकीला Pool Officer म्हणतात. परदेशी जाऊन पदवी घेऊन परत आलेल्या हिंदी लोकांना चांगली

नोकरी मिळेपर्यंत त्यांची कुचंबणा होऊ नये म्हणून दिलेले हे मानधन असते. कोठच्या तरी युनिव्हर्सिटीमध्ये किंवा मान्य संस्थेत राहून आपले स्वतःचे काम करीत रहावे, असा दंडक असतो. ह्या विद्यार्थिनीच्या मनात मुंबईला रहावे असे होते. पण तेथे कोणी घेईना म्हणून पुण्याला बाईंकडे आली. डेक्कन कॉलेजच्या प्रमुखांनी तेथे राहून काम करण्यास परवानगी दिली. ही बाई जितकी हुशार तितकीच अती एककल्ली व मानी. मी कॉलेजला असताना एकदा वर्गाच्या अभ्यासकीय सहलीबरोबर तिला व एका तरुण अध्यापकाला पाठवले. चार मुलगे व एक मुलगी होती. मुलीबरोबर बाईमाणूस असावे व तिलाही पूर्वी कधी न केलेल्या कामाचा, प्रदेशाचा व वन्यजमातीचा अनुभव असावा, ही कल्पना माझ्या मनात होती. ह्या सहलीतून तीनच दिवसांत ही बाई परत फिरली. "तुम्ही बरोबर पाठविलेल्या अध्यापकाने माझा अपमान केला. B.D.O. कडे मला घेऊन जाण्याऐवजी तो त्या मुलीला घेऊन गेला." मी म्हटले, "तक्रार बरोबरही असेल; पण तुझ्यावर एक मोठी जोखीम होती. ती पार न पाडता तू निघून आलीस, हे बरोबर केले नाहीस. मला पत्र पाठवायचे होतेस. आता त्या मुलीवरून काय भानगडी उत्पन्न होतात कोण जाणे?"

ह्या माझ्या जुन्या विद्यार्थिनीच्या मनात पुणे विद्यापीठात शक्यतर नोकरी करावयाची होती. इतर आलेल्या २-३ नोकऱ्यांना तिने नकार दिला होता. माझीही ना नव्हती. पण एक जागा सोडून दुसरीकडे जाण्याचा तिचा प्रघात व आता जबाबदारी टाकून रागाने निघून येण्याच्या प्रसंगामुळे हुशार असूनही तिला जबाबदारीची जाणीव येणे शक्य नाही, असे मला वाटले. — माझ्या गोष्टीचा सर्वांत जुना एक धागा हा.

दहा वर्षांपूर्वी माझ्या विभागात एक लेक्चरर घेतला. आमच्या जाहिरातीला त्या एकाच उमेदवाराचा अर्ज आला होता. त्यानंतर थोड्याच महिन्यांनी एक विद्यार्थी माझ्याकडे Ph. D. साठी म्हणून आला. ह्या विद्यार्थ्याशी माझी नीट ओळख झालेली नव्हती. नव्यानेच कामास - मुख्यत्वे वाचनालयात पुस्तके वाचून, टीपा काढण्यास वगैरे - सुरुवात झाली होती. जसे इतर चार विद्यार्थी तसाच हाही एक होता. त्यानंतर काही महिन्यांची गोष्ट! पुरातत्व खात्याचे प्रोफेसर व माझ्या विभागाचे डेक्कन कॉलेजातील प्रमुख डॉ. सांकलिया माझ्याकडे आले व म्हणाले, "उत्खननात सापडलेल्या सबंध सांगाड्यांच्या फुटकळ हाडांचे मोजमाप व वर्णन करता का? नाहीतर हा सर्व माल दिल्लीला व कलकत्यात पाठवावा लागेल." मी म्हटले, "आपल्याकडे मानवशास्त्राची शाखा असताना असे करणे मोठ्या कमीपणाचे होईल. मी एकटी नाही तरी माझे सहाध्यापक व मी मिळून हे काम करू." मी नवीनच नेमलेल्या लेक्चररला बोलावणे पाठवले व "असे असे काम आहे. आपल्याजवळ अशी अशी उपकरणे आहेत, ही पुस्तके आहेत, एक मोठे टेबल मांडून काम करावयास सुरुवात करा. कोठे अडले तर मला विचारा. मला सध्या दुसरे मोठे काम असल्यामुळे काम करता येणार नाही" असे त्यांला सांगितले. आठ दिवसांनी सांकलिया परत आले व म्हणाले, "तुमचा लेक्चरर आमच्या बाजूला फिरकला नाही. निरोप पाठवला तर उत्तर नाही. काय करावे?" मी म्हटले, "हरकत नाही. त्या लेक्चररचीच पदवी असलेला, त्याच युनिव्हर्सिटीचा एक विद्यार्थी माझ्याकडे आहे. तो व मी मिळून काम करतो." त्या विद्यार्थ्याला बोलावून लेक्चररला सांगितले तेच त्याला सांगितले. दोन दिवसांनी त्याला बोलावले तो त्याने सुरुवात केलेली होती. "तुमची गरज लागली नाही, अडले तर तुमच्याकडे येईन", असे त्याने सांगितले. पण तो आला नाही. त्याने सांकलियांचे काम इतके छान व इतक्या झटपट केले की, सांकलिया खुश झाले. आपले अशा तऱ्हेचे काम त्याला देऊ लागले. एवढेच नव्हे, तर त्याला तीन उत्खननप्रसंगी आपल्या बरोबर घेऊन गेले. इकडे माझ्याकडे विद्यार्थी म्हणून त्याचे काम चाललेच होते. काही वर्षांनी त्याला Ph. D. मिळाली. माझ्या विभागात एक हंगामी नोकरी होती. ह्या मुलाचे काम व विषयाची आवड पाहून त्याला नेमावे, असे माझ्या मनाने घेतले. हा जो अध्यापक (लेक्चरर) नेमला होता तो व त्याच्यानंतर लगेच आणखी एक नेमला होता तो अशा दोघांनी येऊन "बाई, तुम्ही ह्या माणसाला नेमू नका, तो दोन नावांनी वावरतो", असे मला सांगितले. त्यांच्या आरोपाची मी चौकशी केली. मला त्यात तथ्य दिसले नाही म्हणून मी त्याला

नेमले. ह्या दोन नावांची भानगड काय, म्हणून त्याला बोलावून विचारले. तो त्याने सांगितले, "मी साधारण नऊ–दहा वर्षांचा असताना आमचे कुटूंब पश्चिम पाकिस्तानातून निर्वासित म्हणून आले, ते थेट अलाहाबादला आले. तेथील हिंदी शाळेत माझे आडनाव मल्होत्रा म्हणून लावले गेले होते. शाळेच्या सर्व परीक्षा, मॅट्रिकची परीक्षा, इंटरसायन्सची परीक्षा, बी. एस्सी. परीक्षा व एम. एस्सीची परीक्षा एवढेच काय, तुमच्या हाताखाली झालेली पीएच. डी. ची पदवीही मी त्याच नावाने घेतली. दिल्लीतील विद्यार्थी व माझे प्राध्यापक या सर्वांना हे माहीत आहे." ह्या खुलाशात मला काही काळेबेरे दिसले नाही. माझ्या जुन्या लेक्चररचे म्हणणे पडले की, "मल्होत्राने स्वार्थासाठी हे केले. मल्होत्रा हे नाव पंजाबात क्षत्रियजातीत असते, तर 'मेहेरोत्रा' हे नाव उत्तर प्रदेशात ब्राह्मणाचे असते." हा युक्तिवादही मला फोल वाटला. अब्राह्मण क्षत्रिय जाऊन ब्राह्मणाचे नाव घेण्यामुळे हल्लीच्या दिवसांत काही स्वार्थ साधला असेल, हे मला पटले नाही. मल्होत्राची मी नेमणूक केली .

मल्होत्राच्या भोवती मुलांचा व मुलींचा घोळका कायम असे. आजही असतो. विशेषतः मुलींच्या मैत्री-बद्दल इतरांमध्ये फार कुजबुज; पण प्रत्यक्ष त्याच्याविरुद्ध कोणा मुलीने वा मुलीच्या आईवडिलांनी माझ्यापर्यंत आजवर तक्रार आणलेली नाही. मी त्याला एकदोनदा विचारले तर तो सांगे, "बहुतेक मुलेमुली मानवशास्त्र व समाजशास्त्र शाखेतील विद्यार्थी आहेत. काही कळले नाही तर, किंवा काही निबंध लिहावयाचा असल्यास माझ्याकडे येतात. इतर काहींशी ओळख व मैत्री आहे व इतर मैत्रिणींशीही मी प्रगटपणे व चारचौघांत अदब न सोडता वागतो. माझ्या वागण्यात मला काही गैर दिसत नाही." माझ्या स्वतःच्या मुलांचेही विचार असेच; त्यांच्याही मित्रमैत्रिणी. तेव्हा मला मल्होत्राचे म्हणणे पटले. हे सर्व लिहावयाचे कारण थोड्या वेळात कळेलच.

१९६७ साली दिवाळीच्या आधी वर्गाची अभ्यासकीय सहल गेली. बरोबर गेलेली माझी एक जुनी विद्यार्थिनी सहल मध्येच सोडून आली, हे मागे सांगितलेच आहे. सहल संपवून सहलीचा वृत्तान्त द्यावयास मल्होत्रा माझ्या खोलीत आला तेव्हा त्या विद्यार्थिनीचा अपमान का केलास म्हणून विचारले, तर तो म्हणाला, "मी अपमान केला असे मला वाटत नाही. ज्या दिवशी मी B.D.O. कडे गेलो त्या दिवशी त्या मुलीला घेऊन गेलो हे खरे; पण मला वाटले, बाई प्रवासाने दमल्या असतील म्हणून मी त्यांना त्रास होऊ नये म्हणून गेलो. इतके असूनही काही अपराध झाला असल्यास क्षमा करावी म्हणून मी व समस्त विद्यार्थी-गटाने बाईंची करुणा भाकली; तरीही बाई रागाने निघून आल्या. सर्व काम मी इतके छान केले की, तुम्ही माझी पाठ थोपटाल ह्या आशेने मी आलो, तर तुम्ही रागावलेल्या." असे म्हणून तो अक्षरशः रडला. मी म्हटले, "एक लेक्चरर व एक Pool Officer ह्यांच्यात मला खरेखोटे करावयाचे नाही. झाल्या गोष्टी होऊन गेल्या. तुम्ही हे भांडण विसरावे. त्या मुलीच्या आईवडिलांनी काही तक्रार आणली, तर मात्र आपणा कोणाचीच धडगत नाही."

अशा तऱ्हेच्या संधीची वाट माझे जुने लेक्चरर पाहतच होते. मल्होत्राचे त्या मुलीशी वर्तन ठीक नव्हते, अशी बातमी सर्व युनिव्हर्सिटीभर पसरवण्यात आली. माझ्या मागे मुलांना बोलावून रजिस्ट्रारने चौकशी केली. मी त्याबद्दल रजिस्ट्रारला विचारले की, "तुम्ही मला न सांगता हे काय केलेत?" मला उत्तर मिळाले, "तसे विशेष काही नाही. चार मुलांपैकी एक मुलगा गैरवर्तणूक झाली म्हणतो. दोघे गुळमुळीत आहेत व एक मुळीच काही झाले नाही असे म्हणतो. तेव्हा ह्या प्रकरणात तथ्य नाही." मी त्यांना "सर्व प्रकार थांबवा व एखाद्या मुलीच्या नावे उगाच कंड्या पिकवण्यात मदत करू नका", असे सांगितले व प्रकरण तेथे थांबले.

पुढे माझ्या विभागात दोन रीडर (लेक्चररच्या वरची जागा) नेमण्याची परवानगी व पैसे दिल्लीच्या युनिव्हर्सिटी ग्रँटकडून मिळाले. मी मल्होत्राला पसंत करण्याचा संभव आहे असे वाटताच कारस्थानाची चाके फिरू लागली. जो लेक्चरर आपल्या Ph. D. बद्दल आतापर्यंत बराच बेफिकीर (आळशी?) होता, तो जोरात अभ्यास करून प्रबंध लिहू लागला; ही गोष्ट चांगलीच झाली. एप्रिल-मे च्या सुमारास एक कमिटी नेमली. त्यावर माझ्यासकट चार मानवशास्त्रज्ञ (हिन्दुस्थानात आपापल्या युनिव्हर्सिटीत

त्या विषयाचे प्रमुख) व एक आमचे व्हाइस चॅन्सेलर अशी कमिटी. मल्होत्रापेक्षा वरचढ गुणाने असा एकच मनुष्य होता. त्याने इंग्लंडमध्ये लॅबोरेटरीत क्रोमोसोपवर सर्व काम केलेले. तशा तऱ्हेची लॅबोरेटरी व उपकरणे आमच्याकडे नाहीत म्हणून त्याला वगळला. (आता तो दिल्लीत बड्या नोकरीवर आहे.) दुसरा मल्होत्रा. ,तो डॉक्टर झालेला व जवळजवळ २० लहानमोठे संशोधनात्मक लेख लिहिलेला —निम्मे पुरातत्त्व विभागा-कडून व निम्मे मनुष्यशरीरशास्त्रातील. त्याच्या तोडीचा दुसरा नव्हताच. त्याची एकमताने निवड झाली व दुसरे एक नाव गुणांनी त्याच्या खूप खाली असलेल्या लेक्चररचे पडले. दुसऱ्या नेमणुकीसाठी गायकवाड म्हणून एका माणसाची निवड झाली व ती पूल ऑफिसर मागे पडली. कारण तिला जबाबदारीची जाणीव नाही, असे सांगणे पडले.

एक दिवस एक विद्यार्थी भीत भीत माझ्याकडे आला व म्हणाला, "बाई, आम्ही एक फार वाईट गोष्ट केली आहे. हे लेक्चरर आमचे परीक्षक आहेत. मी सांगतो तसे पत्र व्हाइस चॅन्सेलरला लिहा नाहीतर तुम्हाला नापास करतो, असे त्यांनी सांगितल्यावरून त्यांनी सांगितले तसे मल्होत्राविरुद्ध एक पत्र लिहून आम्ही पाठविले आहे. मात्र ज्या कागदावरून आम्ही ते पत्र उतरवले त्याच्या पहिल्या पानाची फोटोप्रत आम्ही काढलेली आहे. त्या प्रतीसाठी मी हात पुढे केला तर हा विद्यार्थी मला म्हणतो –" मी फोटोप्रत आपल्याला देणार नाही. एवढे केले आहे त्याचे फळ आम्हाला मिळाले पाहिजे निकालानंतर देईन." असे म्हणून तो गेला. एवढेच नाही तर त्या दिवशी सर्वच विद्यार्थी पुण्यातून नाहीसे झाले. त्या वेळी प्रो. गर्दे हे रजिस्ट्रारचे काम पाहत होते. मी त्यांच्याकडे जाऊन ही सर्व हकीगत त्यांना सांगितली. त्याच दोन विद्यार्थ्यांनी डॉ. मल्होत्राला दिल्लीला अशाच अर्थाचे एक पत्र लिहिले होते. ते पत्र दिल्लीहून री-डायरेक्ट होऊन मल्होत्रा पुण्याला आला तेव्हा मिळाले. ते पत्र व वर निर्देशिलेली फोटोकॉपी दोन्हीही काही दिवसांनी रजिस्ट्रार गोळे हे कामावर रुजु झाल्यावर त्यांना दिली. "काही काळजी करण्याचे कारण नाही. आम्हाला आलेले पत्र खोटे आहे, अशी माझी खात्री झाली आहे", असे त्यांनी सांगितले. माझा लेक्चरर त्याच सुमारास Ph. D. संपवण्यासाठी रोज माझ्याकडे येत होता. "तू करतो आहेस ते अगदी वाईट आहे.", असे मी त्याला म्हटले. तो काहीही बोलला नाही. "तुम्ही दहा वर्षं काही केले नाही. पुढच्या दोन वर्षांत मी रिटायर झाले म्हणजे परत एक जागा रिकामी होईल. काही चांगले संशोधन करून लिहा. तुम्हाला चान्स आहे; पण अशी कृत्ये करू नका." त्या माझ्या कळकळीच्या सांगण्याला उत्तर आले नाही. त्या वेळी Ph. D. प्रबंध सर्वस्वी माझ्या हाती होता. मी घास पुरता भरवला. त्याचा लेख नुसता तपासलाच नाही तर जेथे त्याला अवघड जात होते, तेथे मी सांगून त्याच्याकडून लिहवून घेतला. रोज दोन-दोन तास हे काम चाले. आपण आपल्या गुरूचा गळा कापला आहे, याची जाणीव त्यास असावीसे वाटते. पण त्याला त्याचे काही नव्हते. "मी येथे १० वर्षे आहे. मी संशोधन केले नाही तरी पीएच.डी झालो पाहिजे", ही त्याची धारणा.

माझ्या हकीगतीतला हा दुसरा धागा.

आता तिसरा पेड –

सुमारे चार वर्षांपूर्वी मी काम करीत बसले असताना एक गृहस्थ एका मुलीला घेऊन माझ्या खोलीत आले. "मी एक पुण्यातील वकील. ही माझी भाची. दिल्लीची M.Sc. आहे. तुमच्या हाताखाली काही काम आहे का?" माझ्या नकारावर गृहस्थ उद्‌गारले, "तिला नोकरीची गरज नाही. परीक्षा झाल्यावर उगीच इकडेतिकडे रिकामटेकड्या गप्पा मारू नयेत, म्हणून तुमच्याकडे आणली आहे. तुमच्या विषयातलीच आहे. काय असेल ते काम सांगा. ती रोज येईल." मुलगी येऊ लागली. हुशार होती; काम छान करू लागली. मनमिळाऊ होती. सर्वांना आवडू लागली. "तू Ph. D. साठी नाव का घालीत नाहीस?" तर म्हणे, "माझे मामा स्थळं पाहत आहेत. मला लग्न करायचे आहे. उगाच नव्या अभ्यासाच्या फंदात पडायचे नाही."

एक मुलगा तिला आवडला व 'आता लवकरच माझे लग्न होणार', म्हणून तिने सर्वांना सांगितले. बरेच दिवस ती आली नाही. एक दिवस आली तर मी म्हटले, "काय लग्नाच्या तयारीत गुंतलीस काय?" तर कपाळाला




हात लावून म्हणते, "बाई, माझे लग्न होत नाही. मला शंका येते, मामाच्या मनात माझे लग्नच होऊ द्यायचे नाही." मी सर्व बोलणे थट्टेवर नेले. ती गेली ती महिन्याने परत आली." बाई, मी चोरून आले आहे – आईचा व मामाचा माझ्यावर पहारा आहे. मी कशी सुटू ते सांगा." मी म्हटले, "बाई, तू कोर्टात जाऊ शकतेस. पण श्रीमंतीत वाढलेली, तुला एकटे राहणे जड जाईल." परत काही दिवसांनी आली. "बाई, मला कूर्गला स्टूडन्ट रॅलीला जायचे आहे. मामा पाठवतो आहे. तेथून मी मद्रासला पळून जाणार. तेथून दिल्लीला माझे पालक आहेत, त्यांच्याकडे जाईन. माझा निश्‍चय झाला आहे." मी म्हटले, "एवढा लांबचा प्रवास एकटीने आगगाडीने करू नको." मी बंगलोर–दिल्लीचे विमानाचे तिकीट काढून दिले. पुढे मला कळले की, पहिल्याने ठरलेल्या मुलाशी तिचे लग्न झाले. पुढे नवऱ्याबरोबर ती पुण्यास भेटली व तिने मला सांगितले की, "मी भयंकर प्रकारातून सुटले. ते माझे मामा किंवा नातेवाईक नव्हतेच मुळी." मी पुढे चौकशी केली नाही वा वाच्यताही केली नाही. पण त्या मामांनी युनिव्हर्सिटीच्या सर्व कमिट्यांत प्रवेश मिळवला व ते माझ्यावर सूड घ्यावयाची संधी शोधीत होते. ती माझ्या लेक्चररच्या निमित्ताने त्यांना मिळाली. – हा माझ्या हकीकतीचा तिसरा धागा!

१९६७ च्या सप्टेंबर महिन्यात मी टोकिओला इन्टरनॅशनल कॉन्फरन्स ऑफ ॲन्थ्रोपॉलाजीला गेले. तेथून मी साधारण १० दिवसांत परतले. आल्या दिवशी किंवा त्याच्या दुसऱ्या दिवशी मला युनिव्हर्सिटीतून रजिस्ट्रारांचा फोन – "तुमच्या विभागातील मल्होत्रांना आम्ही काढून टाकणार आहोत; पण त्यांनी हवे असल्यास राजीनामा द्यावा." "का काढून टाकणार आहात? मला व्हाइस चॅन्सेलरशी संभाषण करू द्या. त्याच्या-विरुद्ध आहे तरी काय?" अशी विचारणा केल्यावर मला मुलाखत मिळाली. मुलाखतीत काय झाले हे सांगण्याआधी मला मागाहून कळलेली हकीगत इथे सांगितली पाहिजे.

माझ्या लेक्चररने विद्यार्थ्यांकडून लिहिलेले पत्र तसेच पडून आहे असे कळल्यावर त्या वकिलांने एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलमध्ये त्या पत्राचा प्रश्न आणला व मल्होत्रा कसा भयंकर माणूस आहे, किती अनीतिमान आहे याचे इतके भडक चित्र रंगवले की, त्याला काढून टाकण्याचे तेथेच ठरले. हा मनुष्य कर्व्यांच्या विभागातील आहे, त्यांना विचारावे, एवढी साधी गोष्टही कोणास सुचली नाही. व्हाइस चॅन्सेलर नवे, वृद्ध, पुणे माहीत नसलेले. बोलणारे वकील व ते दोन्हीही खानदेशाचे. त्यांनीही मान डोलावली व मल्होत्राला काढून टाकावे, असे ठरले. त्याच्यावर आरोप काय व ते खरे आहेत का, आरोप करणारे कोण, हे पत्र जबरीने लिहवले गेले असा प्रवाद आहे वगैरे गोष्टी त्या वेळी पुढेही आल्या नाहीत.

एक गोष्ट सांगायची राहिलीच. ज्या मुलीच्या नावाने एवढा गवगवा झाला, तिच्याशी मल्होत्राचे मोठ्या समारंभाने लग्न झाले.

मी व्हाइस चॅन्सेलरना भेटावयास गेले, तेव्हा त्यांनी मल्होत्राविरुद्ध तीन आरोप सांगितले - १) त्या मुलीशी गैरवर्तन कोणते? व्हाइस चॅन्सेलरनी सांगितले नाही पण मला कळाले की, सहलीबरोबर गेलेला आमचा शिपाई म्हणतो, त्या मुलीचा मल्होत्राने मुका घेतला. आरोप मल्होत्राला कबूल नाही. एक विरुद्ध एक. कोण खरे मानायचे? २) तो दोन नावांनी व्यवहार करतो. इतकेच नव्हे तर वर्षांपूर्वी त्याचे लग्न ठरले होते तेव्हा निमंत्रण पत्रिकेवर त्याच्या बापाने मेहेरा अशी सही केली. बापाला विचारले. (तो सुदैवाने तेव्हा येथे होता.) तो म्हणाला, "पंजाबात मल्होत्रा व मेहरा एकच. आमच्याच कुटुंबात काहीजण मल्होत्रा तर काहीजण मेहरा नाव लावतात." दोन नावांनी किंवा तीन नावांनी व्यवहार हा काही गुन्हा नव्हे. जे व्यवहार झाले ते उघडे व सार्वजनिक होते. त्यात गुप्त काहीच नव्हते. निरनिराळी नावे गुन्हे करण्यासाठी घेतली असे सिद्ध झाले, तर गोष्ट निराळी. तसे सिद्ध झाले नाही. (इतकी कटकट झाल्यावर मल्होत्रा पुण्याच्या कोर्टात जाऊन 'मेहरोत्रा' तो मी 'मल्होत्राच' असे ॲफिडिवीट करून आला. दिल्ली युनिव्हर्सिटीत विद्यार्थ्यांबरोबर काढलेला फोटो त्याने हजर केला होता.)

तिसरा अपराध तर फारच विचित्र. तो म्हणजे मल्होत्राने आपल्या खोलीची किल्ली मौर्य नावाच्या माणसास दिली व त्याने खोलीचा उपयोग अनैतिक कामासाठी केला.

मल्होत्राला विचारले तर त्याने सांगितले, "हा मौर्य पुणे युनिव्हर्सिटीतील लेक्चरर. त्याच्या आधी तो डेक्कन कॉलेजात Ph. D. चा विद्यार्थी. तो खोली नं. २८ (?) मध्ये तर मल्होत्रा खोली नं. २९ (?) मध्ये. सहाध्यायी ह्यापलीकडे ओळख नाही." तो कधी कधी डेक्कन कॉलेजात वाचावयास येई. त्याने दोनदा कॉलेजवर येऊन (एकट्यानेच) किल्ली मागितली. त्याने दिली. त्याच्याबरोबर कोणी होते, हे त्याला मागाहून कळले. पण Scandal अशी कळली नाही. व्हाइस चॅन्सेलरच्या सर्व आरोपांना मी उत्तरे दिली.

डॉ. सांकलियांनी जाऊन सांगितले की, "बाईंना नाही इतकी माहिती मला आहे. कारण हा मुलगा तीनदा माझ्याबरोबर उत्खननाला आला आहे. अशा वेळी कँपात मनुष्य २४ तास बरोबर असतो. हा मुलगा कामात कधी मागे नसतो व वागणुकीने नम्र व सद्वर्तनी आहे. तसा नसता तर मला कळले असते." व्हाइस चॅन्सेलरने त्यांचेही म्हणणे ऐकले नाही. त्यांना एवढे मात्र कळले की, कोठचाही आरोप सिद्ध करता येत नाही व आरोप ठेवून काढले तर आपण पकडले जाऊ. म्हणून आरोप न ठेवता टेंपररी म्हणून त्याला नोटीस देऊन काढून टाकले.

तीस वर्षांत मला एक चांगला विद्यार्थी व सहकारी मिळाला होता. त्याला काढून टाकल्यामुळे माझी म्हातारपणची काठी मोडली . त्या मनुष्यावर मोठा अन्याय झाला.

त्याच्याविरुद्ध कारवाया सारख्या चालू आहेत. डेक्कन कॉलेजच्या आवारात कोणी पिशवीतून एक मूल टाकले. बाई बसने येऊन मूल टाकून गेली असे दिसते. ते मूल मल्होत्राचे अशी आवई उठवली गेली. मूल कोणाचे हे एका आईला व देवाला माहीत. त्यांना कसे कळले कोण जाणे?

एक वकील व द्वेषाने ग्रासलेला एक लेक्चरर ह्यांचे कारस्थान असे सिद्धीस गेले. कमिटीने पसंत केलेला गायकवाड नावाचा रीडरही नेमला गेला नाही. वकिलाने मला सर्वस्वी नेस्तनाबूद केले.

त्या दोघांचा द्वेष व कारस्थान मला कळू शकतात. पण त्याला इतरांनी का हातभार लावावा, ते कळत नाही. त्यातूनही माझ्या स्वतःच्या विभागातील तरुण माणसांनी? ती सर्व मल्होत्राविरुद्ध. म्हणजे पर्यायाने माझी विचार व विवेकशक्ती नाहीशी झाली आहे, असे म्हणणाऱ्यांपैकी.

खरोखरच सगळ्याच तरुण माणसांनी असेच मत सांगितले असते, तर मला माझे ग्रह तपासून पहावे लागले असते, पण इन्स्टिट्यूटबाहेर अशी बरीच तरुण माणसे आहेत की, त्यांनी ही सबंध case नीट पारखून पाहिली आहे. त्यामध्ये एक फार नामवंत वकीलही आहेत. एकही आरोप सिद्ध झालेला नाही. हा त्या माणसांचा पहिला मुद्दा व दुसरा म्हणजे केलेले आरोप गुन्हेगारीही दर्शवीत नाही व पापही दर्शवीत नाहीत. औचित्यभंग, निष्काळजीपणा, सहाध्यायावर विश्वास वगैरे म्हणावे पाहिजे तर; पण खरोखरीच ज्याला moral tarpitude म्हणता येईल अशी कोणतीही गोष्ट त्यात आली नाही.

बाहेरच्या तरुण मंडळींचा असा अभिप्राय पडल्यामुळे तर माझ्या मनाचा गोंधळ.व वेदना वाढतात.

ज्यांना मी सहकारी म्हणते, त्यांच्या व माझ्या सामाजिक मूल्यांमध्ये जमीन-अस्मानाचे अंतर आहे. विद्यार्थ्यांना परीक्षेच्या वेळी गाठून, तुम्हाला नापास करीन अशी धमकी देऊन एखाद्याविरुद्ध पत्र लिहून घेणे व त्या माणसाला माणसांतून उठवणे ही गोष्ट मला पाप व गुन्हा वाटते. माझ्या सहकाऱ्यांना तसे काहीच वाटत नाही. कारण असे करणाऱ्या इसमाशी त्यांचे संभाषण व व्यवहार चालू आहेत. ह्या माणसाने सर्व हिंदी युनिव्हर्सिट्यांत पत्रव्यवहार करून हा मनुष्य पुण्याहून काढून टाकला आहे, ही बातमी दिली आहे.

एखाद्या बाईचा मुका घेणे, राजरोसपणे वर्षानुवर्षे दोन नावांनी वागणे व एखाद्या सहाध्यायाला आपल्या खोलीची किल्ली देणे ह्या गोष्टी मला पापही वाटत नाहीत व गुन्हाही वाटत नाहीत. पण त्या माणसाशी माझे सहकारी बोलणे टाळतात. त्याला काढून टाकल्याने त्याची नाचक्की झाली. तो अन्नाला महाग झाला . लग्न होऊन महिना झाला नाही तोच त्याच्या बायकोला (ज्या मुलीचा मुका घेतला असे म्हटले जाते, ती हीच.) नोकरीसाठी लांब जावे लागते, ह्याबद्दल एकालाही कणव

अनुक्रमणिका






नाही.

जे सामाजिक मूल्यांबाबत तेच शैक्षणिक व संशोधनविषयक मूल्यांबाबत. १० वर्षे विभागात राहून Ph. D. झाला नाही व ज्याने ३ प्रबंध लिहिले नाहीत व जो चांगले शिकवत नाही अशा माणसाला वगळून त्याच्यापेक्षा तरुण, Ph. D. झालेल्या व १५ लहान-मोठे संशोधनात्मक लेख लिहिणाऱ्या माणसाला मी निवडले ही माझी चूक झाली, असे त्यांना वाटते. म्हणजे माझ्या सहकाऱ्यांना माझी शैक्षणिक व शिक्षणविषयक मूल्येही पसंत नाहीत .

त्यांच्या वागणुकीचा आणखी एक अर्थ होतो व तोही भयंकरच – मी फार दिवस माझ्या विभागाची प्रमुख म्हणून राहिले. माझे वय झाले आहे. त्याआधी मी मेले असते, किंवा सुज्ञपणा दाखवून रिटायर झाले असते, तर कदाचित माझा निरोपसमारंभ झाला असता. एखाद् दुसरा माझ्या आठवणी काढून गहिवरलाही असता. पण मी इतकी मूर्ख की, म्हातारपणी काय दशा होते हे ज्ञानेश्वरीत दहादा वाचूनही ठणठण कोरडी - ज्ञानहीन राहिले. आपण म्हातारे तर झालो, ही जाणीव तरुण पिढीने द्यावी लागली. ज्या चुलीची खीर खाल्ली त्या चुलीची राख तोंडात भरून राहिली आहे. इतक्या जबाबदाऱ्या अंगावर घेतल्या आहेत की, त्यांच्यामधून लांब जाता येत नाही. एक खोटे हसू तोंडावर चिकटवून जणू मला त्यांच्या वागण्याचे काहीच वाटत नाही असे दाखवीत, येथे त्याच सर्वांच्या देखत काम करावे लागते. हे जिवंत मरण आहे.

＊＊＊

# फ्रान्सिस फुकुयामा यांचा 'इतिहासाचा शेवट'

अशोक कृष्णाजी जोशी

(१)

इतिहास ही कल्पना जरी जुनी असली, तरी इतिहास हा अभ्यासविषय फार जुना नाही. तो अनेक विद्वानांनी अभ्यासविषय म्हणून भूतकाळात हाताळला होता, असे म्हणता येणार नाही. इतिहासाचा अभ्यासविषय म्हणून शास्त्रशुद्ध अभ्यास एकोणिसाव्या शतकातच सुरू झाला, असे म्हणणे योग्य होईल. इतिहास म्हणजे काय, याविषयी अगदी वेगळी, टोकाची, बऱ्याच वेळा परस्परविरोधी मते असतात; पण त्याच वेळी इतिहासासंबंधीच्या जाणिवेविषयी काही सर्वमान्य भागही आहे. इतिहास हे भूतकाळाविषयीचे विधान असते व त्यात भूतकाळाची मांडणी एका विशिष्ट प्रकारे केलेली असते. आपल्या विधानाच्या समर्थनार्थ पुरावे गोळा केले जातात व इतरांसमोर ते मांडले जातात. इतिहासात विज्ञानासारखी अचूकता अपेक्षिता येत नाही. सर्वमान्यताही इतिहासात येऊ शकत नाही. अभ्यासकाचा दृष्टिकोण इतिहासात महत्त्वाचा असतो. इतिहास विज्ञान नसून एक सामाजिक शास्त्र आहे, अशा काही जवळजवळ सर्वमान्य बाबीही इतिहासाभ्यासात आहेत. हे सर्व लक्षात घेतले की, इतिहासाच्या मर्यादा व सामर्थ्य ध्यानात येते.

सर्वसामान्यतः असे मानले जाते की, विशिष्ट काळाचा, राजवटीचा, स्थानाचा, राष्ट्राचा, प्रदेशाचा मागोवा घेणे म्हणजे इतिहासाचा अभ्यास करणे होय. काही वेळा टोळी, कुटुंबे, विशिष्ट प्रकारचे लोक यांच्याही भूतकाळाचा मागोवा घेतला जातो. विशिष्ट गोष्ट समोर ठेवून अभ्यास करणे, हा पण इतिहासच असतो.

इथे आपण पाश्चात्त्य परंपरेचा विचार करत आहोत. ग्रीक संस्कृती व ज्ञानपरंपरा ही पाश्चात्त्य परंपरेतील आद्य ज्ञात परंपरा व संस्कृती आहे. प्लेटो हा सर्वज्ञात बुद्धिमंत इतिहासासंबंधी जे बोलला होता, ते आपण नंतर अधिक विस्ताराने पाहणार आहोतच. पण आधुनिक काळात १८ व्या शतकानंतरच इतिहासाच्या सिद्धान्ताबद्दल व इतिहासाच्या वैश्विकतेबद्दल गंभीर स्वरूपाचे चिंतन झाले, असे आपण नक्की म्हणू शकतो. १७ व्या व अठराव्या शतकांतल्या युरोपातल्या ज्ञान-विज्ञान व औद्योगिक क्रांतीनंतर युरोपमध्ये दळणवळणाच्या साधनांत मोठी क्रांती झाली. आधीचा माणसाचा लहानसा अवकाश विस्तारला. नव्या दळणवळण साधनांमुळे सीमित प्रदेशात ज्ञान अडकून न राहता ते सर्वत्र फैलावू लागले. जणू ज्ञान व दळणवळण यांची एक क्रांतीच या काळात झाली. १८ व्या शतकात सुरू झालेली ही क्रांती आजही सुरूच आहे. २१ व्या शतकातला माणूस याच क्रांतीची मधुर फळे चाखत आहे.

या ज्ञानात जसे समकालाविषयीचे ज्ञान समाविष्ट होते, तसे भूतकाळाविषयीचे ज्ञानही समाविष्ट केले होते. अधिक विश्वसनीय व समर्पक पुरावे या स्वरूपात भूतकाळाविषयीचे हे ज्ञान समोर येत गेले. आद्य माणसाच्या टोळ्या जगाच्या पाठीवर कशा वावरल्या, माणसांचे कसे स्थलांतर झाले, ती कशी व कुठे व का स्थिरावली, वेगवेगळे मानवी वंश कसे निर्माण झाले, असे अनेक गहन प्रश्न नव्याने मिळालेल्या ज्ञानाने सुटलेच.

याच वेळी इतिहासासंबंधी तात्त्विक विचार मांडणारी ज्ञानशाखा एक स्वतंत्र ज्ञानशाखा म्हणून उदयास आली आहे. अगदी प्राचीन काळात प्लेटो या ग्रीक तत्त्वज्ञाने इतिहासासंबंधी तसा विचार मांडला होता. १८ व्या व विशेषतः १९ व्या शतकात कांट, हेगेल, मार्क्स यांनी इतिहासासंबंधी असा तात्त्विक विचार केला आहे. विसाव्या शतकाच्या मध्यावर हेगेलचा सिद्धान्त स्पष्ट करताना अलेक्झांडर कोजेवे याने असाच विचार केला. विसाव्या शतकाच्या अंतिम दशकात फ्रान्सिस फुकुयामाने इतिहासासंबंधी तात्त्विक विचार करताना प्रथम लेख लिहिला व नंतर THE END OF HISTORY हे गाजलेले

अनुक्रमणिका

पुस्तक लिहिले. या पुस्तकात त्याने इतिहास संकल्पनेचा तात्त्विक आढावा घेताना अलेक्झांडर कोजेवेच्या मताचा मोठाच आधार घेतला आहे.

आजची उदारमतवादी लोकशाही राज्यव्यवस्था ही आजवरच्या सर्व राज्यव्यवस्थांतली प्रगत, उन्नत व्यवस्था असून यापेक्षा अधिक प्रगत व्यवस्था निर्माण होणे शक्यतेच्या कोटीत दिसत नाही, असे त्याचे मत आहे. मानवप्राण्याने टोळीजीवन, माणूस एका जागी स्थिरावलेल्या काळातील जमीनदारी, सरंजामदारी, हुकूमशाही, विसाव्या शतकातील समतेवर आधारलेली साम्यवादी राजवट व लोकशाही हे सर्व अनुभवले आहे. या सर्वांतील उदारमतवादी लोकशाही हाच पर्याय सर्वांत प्रगत पर्याय आहे. त्यापेक्षा अधिक प्रगत, उन्नत राज्यव्यवस्थेचा पर्याय उपलब्ध होणे कठीण आहे, असे फुकुयामाचे मत आहे. उदारमतवादी लोकशाहीच्या उदयाबरोबर मानवी राज्यव्यवस्था व विचारप्रणाली सर्वांत प्रगत अवस्थेस पोचली असून या पूर्णत्वापलीकडे तिची प्रगती कठीण आहे, जवळजवळ अशक्यच आहे, असे त्याचे मत झाले आहे.

फुकुयामाचे प्रतिपादन साधार व आग्रही आहे. आता इतिहासाचे शेवटचे शिखर गाठले गेले आहे, असे त्याला खरोखरच वाटते. त्याच्या मताचा योग्य आढावा घेऊन, ते समजून घेऊन, त्याचे नीट विश्लेषण करणे व त्या मतासंबंधी मत नोंदवणे बरोबर होईल.

(२)

माणसाची आजवरची वाटचाल (म्हणजेच त्याचा इतिहास) लिखित स्वरूपात व निर्विवाद स्वरूपात उपलब्ध नाही. माणूस जरी या पृथ्वीवर काही लाख वर्षे राहत असला, तरी लेखनकला तो गेल्या ३-४ हजार वर्षांतच शिकला. (त्याचे पृथ्वीतलावरचे सुसंस्कृत आयुष्य फार नाही, हे पण एक महत्त्वाचे कारण आहे.) त्याची मोठी ज्ञानपरंपरा मौखिक आहे, तर लिखित ज्ञानपरंपरा छोटी आहे.

इथे पश्चिमेच्या ज्ञानपरंपरेच्या व पश्चिमेच्या संस्कृतीच्या इतिहासाच्या संदर्भातच विचार केला आहे; इतर परंपरांचा विचार इथे केलेला नाही. पाश्चात्त्य ज्ञानपरंपरा तीनेक हजार वर्षे जुनी आहे. इसवी सन पूर्व चौथ्या शतकातला तत्त्वज्ञ प्लेटो याचे चिंतन हे या परंपरेतले इतिहासाविषयीचे प्रथम उपलब्ध झालेले चिंतन असे मानावे लागते.

या ग्रीक परंपरेनंतर आपल्याला १८ व्या शतकातच इतिहासाविषयीचे महत्त्वाचे चिंतन या ज्ञानपरंपरेत उपलब्ध होते. त्या काळाआधी माणसाचा वावरच अतिशय मर्यादित अवकाशात असे. अवकाश व कालाविषयी यापूर्वीच्या काळात गहन विचार केला गेला हे खरे; पण विज्ञान त्या वेळी बाल्यावस्थेत होते, शास्त्रीय शोध लागले नव्हते, औद्योगिक क्रांती झाली नव्हती, माणसाचे ज्ञान फार मर्यादित होते. आता त्या बदलांचा वेग प्रचंड झाला आहे, हे आपल्याला माहीत आहे.

माणसाचे समकाल, भूतकाल व इतिहासाविषयीचे ज्ञान अधिक विश्वसनीय झाले. ते नुसत्या तर्कावर व मतांवर आधारलेले ज्ञान नव्हते. विज्ञानाने साध्य झालेले पुरातत्त्वशास्त्रावर आधारलेले पुरावे, कागदपत्रे यांचा आधार त्यांना होता. आता इतिहासाचे ज्ञान शास्त्राधारित आहे. त्यात मतांना व काल्पनिक तर्कांना काही स्थान नाही.

माणसाचा सर्व बाजूंनी विकास होत आहे, हे आजुबाजूला नजर टाकली तरी दिसते. पण या विकासाला काही दिशा आहे का, इतिहास काही निश्चित दिशेने पुढे जात असतो असे म्हणता येते का, हे प्रश्न आजही अनुत्तरित आहेत.

१८ व्या व १९ व्या शतकांत जर्मन तत्त्वज्ञ कांट व हेगेल यांनी प्लेटोचा विचारधागा पकडला व तो विचार एका निश्चित दिशेने पुढे नेला. मग १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात मार्क्सने आर्थिक बाजूने हा विचार केला. शोषणयुक्त, वर्गाधारित समाजव्यवस्थेकडून माणूस शोषणरहित, वर्गरहित समाजव्यवस्थेकडे जात आहे, असे मार्क्सचे मत होते. मार्क्सनंतर १९ व्या शतकाच्या अखेरीस नीत्शे या जर्मन तत्त्वज्ञाने वंशश्रेष्ठत्व व सामर्थ्याधारित श्रेष्ठत्व या कल्पनांवर आधारलेले आपले मत मांडले. (त्याच्यावर पुढे टीका होणे स्वाभाविक होते.) या सर्व घटनांचा आढावा अगदी विस्तृतपणे फ्रान्सिस फुकुयामाने आपल्या दि एंड ऑफ हिस्टरी या पुस्तकात घेतला आहे व आपले मत मांडले आहे की, माणसाचा










इतिहास आता पूर्ण प्रगत झाला असून राज्यव्यवस्थेच्या संदर्भात माणूस अधिक पुढची पायरी गाठणे, आजच्यापेक्षा माणसाला अधिक प्रगत राज्यव्यवस्था निर्माण करणे शक्य नाही. उदारमतवादी लोकशाही ही सर्वोच्च राज्यव्यवस्था माणसाने निर्माण केली आहे, असे तो म्हणतो.

(३)

१९८९ साली फुकुयामाने द नॅशनल इंटरेस्ट या संशोधन पत्रिकेत द एंड ऑफ हिस्टरी म्हणजेच इतिहासाची अखेर हा लेख लिहिला. त्या लेखामध्ये त्याने आपले मत मांडले की, आज इतिहासाच्या प्रगतीचा अखेरचा टप्पा किंवा सर्वांत अधिक विकासस्थिती आहे. आजची उदारमतवादी लोकशाही ही राज्यव्यवस्था हुकूमशाही, लष्करशाही, साम्यवादी समाजरचना व साम्यवादी राज्यव्यवस्था यानंतरची सर्वांत प्रगत, उन्नत, विकसित व्यवस्था आहे. हे मत मांडताना त्याने विसाव्या शतकाच्या मध्यावरच्या अलेक्झांडर कोजेवे या हेगेलच्या भाष्यकाराच्या मताचा वैचारिक पाठिंबा घेतला आहे. उदारमतवादी लोकशाही ह्या विचारप्रणाली व राज्यव्यवस्थेपेक्षा अधिक प्रगत, विकसित पद्धती भविष्यात अस्तित्वात येणे शक्य नाही, असं त्याला वाटते. लोकशाहीत स्वातंत्र्य व समता ही माणसाला सदैव हवी असलेली मूल्ये पाळली जातात. तीपेक्षा वेगळ्या असलेल्या कोठल्याही राज्यपद्धतीत ती मूल्ये पाळली जाणे फार कठीण आहे, असेही त्याला वाटते. मानवाने आपल्या राज्यव्यवस्थेचा परमोच्च उत्कर्षबिंदू लोकशाही राज्यव्यवस्थेच्या स्वरूपात गाठला आहे, असे त्याचे पक्के मत आहे.

हा मुद्दा अधिक स्पष्ट करण्यासाठी त्याने १९ व्या शतकातील हेगेल व मार्क्स या मोठ्या विचारवंतांच्या मतांचा आधार घेतला आहे. उत्कर्षाच्या एका सर्वोच्च बिंदूला मानवी प्रगती पोचते व मानवी जीवनातले सर्व विरोधाभास संपून प्रगतीचे अगदी शेवटचे टोक गाठले जाते, हे हेगेल व मार्क्स या दोघांचेही म्हणणे होते. हेगेलने हे मांडताना आयडिआ या अमूर्त स्वरूपात असलेल्या संकल्पनेचा आधार घेतला. 'आयडिआ' सतत विकास पावत असते, त्या संकल्पनेच्या क्रमाने विकसित होणाऱ्या अवस्था असतात, अशी हेगेलने मांडणी केली होती; तर अर्थव्यवस्थेचा विकास होत असताना माणसांचे आर्थिक वर्ग निर्माण होतात, त्यांतील प्रबळ वर्ग दुर्बल, हतबल वर्गाचे शोषण करतो व आपण एक वर्ग म्हणून मजेत राहतो, असे मार्क्सचे मत होते. हा विरोधाभास भविष्यातल्या समाजवादी-साम्यवादी समाजरचनेत व अर्थव्यवस्थेत बदलेल, दुर्बल वर्गाचे शोषण थांबेल, भांडवलशाही संपून वर्गमुक्त समाज निर्माण होईल, अशी मांडणी मार्क्सने केली होती. फुकुयामाने या मांडणीपेक्षा वेगळी मांडणी करताना लोकशाही राज्यव्यवस्थेला व सिविल समाजाला आपल्या विचारात केंद्रस्थान दिले. असे करत असताना त्याने इतिहासाच्या विकासाला एक निश्चित दिशा असते, हा हेगेल व मार्क्सचा मुद्दा मान्य केला आहे.

(४)

प्राचीन ग्रीक ज्ञानपरंपरेतल्या प्लेटोने आत्म्याचे तीन भाग असतात, असे मानले आहे. १) इच्छेसंबंधी भाग, २) विवेकासंबंधी भाग, ३) आत्मसन्मानासंबंधी भाग – या भागाला प्लेटो थायमॉस (thymos) असे म्हणतो. आत्म्याचा तिसरा भाग असलेल्या थायमॉसशी संबंधित तीन भावना असतात, असे त्याचे म्हणणे आहे. राग, लज्जा व गर्व या तीन भावना मानवी आत्म्याच्या थायमॉस या भागाशी संबंधित असतात, असे प्लेटोचे म्हणणे होते.

विज्ञानपूर्व काळातल्या संत ऑगस्टीन या ख्रिश्चन संताने बायबलचा आधार घेऊन म्हटले की, अंतिम निवाड्याच्या वेळी पृथ्वीवर स्वर्ग अवतरेल, या पृथ्वीवरील किंवा या नश्वर जगातील घटनाच घडायच्या थांबतील, तो क्षण इतिहासाचा अंत असेल. ऑगस्टीनचे हे म्हणणे अर्थातच एका श्रद्धाळू माणसाचे म्हणणे होते. ते ख्रिश्चन धार्मिक श्रद्धेवर आधारलेले मत होते. त्या म्हणण्याला कोठलाही तार्किक वा शास्त्रीय आधार नव्हता.

त्यानंतर आलेल्या विद्येच्या पुनरुज्जीवन काळातील किंवा रेनेसा काळातील युरोपातील विचारवंतांना ऑगस्टीनचे श्रद्धेवर आधारलेले हे मत मान्य होणे शक्य नव्हते. सतत ज्ञानसाधना केल्याने माणसाची प्रगतीच होत आहे, त्याची अधोगती होत नाही, असा विश्वास रेनेसा विचारवंत बर्नर्ड फॉटेनने व्यक्त केला आहे.

त्या वेळच्या बेकन या श्रेष्ठ विचारवंताला वाटत होते की, कंपास किंवा दिशादर्शकाचा शोध, छापखान्याचा शोध व बंदुकीच्या दारूचा शोध हे तीन शोध त्या काळातले महत्त्वाचे शोध होते व विद्येच्या पुनरुज्जीवनाचा काळ प्राचीन काळापेक्षा श्रेष्ठ व प्रगत असा काळ होता.

त्यानंतरच्या काळातला श्रेष्ठ जर्मन तत्त्वज्ञ इमॅनुएल कांट (१७२४-१८०४) याने १७८४ मध्ये प्रथम वैश्विक इतिहासाची कल्पना स्पष्टपणे आपल्या An Idea for a Universal History from a Cosmopolitan Point of View या निबंधात मांडली. माणसाला आता स्वातंत्र्य मिळाले आहे, त्या स्वातंत्र्यामुळे माणसाच्या सुप्त शक्ती जागृत होऊन प्रगट होत आहेत; माणसाचे व्यक्तिमत्त्व अगदी पूर्णपणे प्रत्यक्षात येईल त्या क्षणी माणसाचा इतिहास पूर्णत्व प्राप्त करून थांबेल, असे त्याचे म्हणणे होते. गर्व, स्पर्धात्मकतेची ओढ, दुसऱ्यावर हुकमत गाजवायची माणसाची वृत्ती, दुसऱ्याच्या कृतींचे नियंत्रण करण्याची मानवी प्रवृत्ती या गोष्टींमुळे तो क्षण येणे कठीण आहे, हे त्याला समजत होते. पण तो माणसाची निर्मितिक्षमता, मानवी स्वातंत्र्य व मुक्त निवड यांना फार महत्त्व देत होता; ही मूल्ये फार दुर्मीळ, समुद्रातल्या बेटांसारखी आहेत, हे तो म्हणतच होता.

(५)

कांटने मांडलेली वैश्विक इतिहासाची संकल्पना १९ व्या शतकातला जर्मन तत्त्वज्ञ जॉर्ज हेगेल (१७७०--१८३१) याने पुढे विकसित केली. असे करताना त्याने प्लेटोच्या थायमॉस या कल्पनेचा उपयोग केला. हेगेलने म्हटले होते की, आजवरचा माणसाचा इतिहास पाहिला, त्याच्या विकासाची व प्रगतीची दिशा पाहिली तर असे आढळते की, त्यात माणसाची इच्छा, आकांक्षा यांचा मोठा वाटा आहे. इतर माणसांनी आपल्या कामाला दाद द्यावी, ते काम व त्याचे महत्त्व समजून घ्यावे ही माणसाची इच्छा असते. आजवरच्या इतिहासाच्या विकासात, त्याच्या गतीमध्ये व त्याच्या दिशेमधे या इच्छेचा निश्चितच भाग आहे.

हेगेलने मान्यता किंवा 'रेकग्निशन' या संकल्पनेचा वापर आपल्या इतिहासविषयक विवेचनात केला. त्याची 'रेकग्निशन' ही कल्पना पाश्चात्त्य बौद्धिक परंपरेला अनुसरणारी आहे व प्लेटो या ग्रीक तत्त्वज्ञाच्या थायमॉस या कल्पनेला जवळची आहे. थायमॉसला प्लेटोने आत्म्याची महत्त्वाची शक्ती असे मानले होते. ही आत्मशक्ती माणसात जन्मजात असते व माणूस त्या शक्तीला आपल्या प्रत्यक्ष जीवनात प्रतिसाद देत असतो, असे तो मानत होता. त्या शक्तीच्या संदर्भात माणूस स्वतःच स्वतःचे मूल्यमापन करीत असतो, स्वतःला न्याय देत असतो, आत्मसन्मान राखीत असतो. त्याला जर वाटले की, आपला योग्य आदर दुसऱ्याकडून राखला जात नाही, तर त्याला राग येतो. हा राग योग्य असतो व तो थायमॉसशी संबंधित असतो.

हेगेलच्या मतांचा आपण बऱ्याच विस्ताराने विचार करणार आहोत, याची दोन कारणे आहेत. पहिले कारण हे की, वैश्विक इतिहासासंबंधी नीट सैद्धान्तिक मांडणी करणाऱ्यांतला हेगेल हा सर्वांत महत्त्वाचा सैद्धान्तिक आहे. दुसरे कारण हे की, फुकुयामाने आपल्या मांडणीत हेगेलला फार मोठे स्थान दिले आहे; त्याने अलेक्झांडर कोजेवे (१९०२-१९६८) या हेगेलच्या भाष्यकाराला पुसतच आपली वाट चोखाळली आहे.

हेगेलने पाश्चात्त्य परंपरेत असणाऱ्या बौद्धिक वारशाचा उपयोग करून घेतला. माणसाच्या आयुष्याचे बौद्धिक-नैतिक अंग व माणसाच्या आंतरिक स्वातंत्र्याच्या कल्पनेचा संबंध त्याने इतिहासचक्राशी, इतिहासाच्या गतीशी, इतिहासाच्या प्रगतीशी जोडला. समाजमान्यता किंवा 'रेकग्निशन' मानवी इच्छेशी संबंधित असते; जोखीम घेण्याची माणसाची इच्छा या समाजमान्यतेशी जोडणे शक्य आहे, असे हेगेलचे मत आहे. भूक, तहान, झोप, सुरक्षा, निवारा या इतर प्राण्यांशी समकक्ष असणाऱ्या माणसाच्या भौतिक इच्छांबरोबरच त्याच्या अभौतिक, मानसिक, आध्यात्मिक इच्छा असतात व काही वेळा त्या प्राणिशास्त्रीय, भौतिक इच्छांपेक्षाही बलवत्तर व प्रभावी असतात. समाजाने आपल्याला वाखाणावे, आपले कौतुक करावे, ही माणसाची सामाजिक व अभौतिक इच्छा आहे. खेळात मिळणारी पदके, युद्धात दिली गेलेली पदके, काही सन्मानदर्शक पदके व मान हे सामाजिकतेशी व अभौतिकतेशी जोडलेले आहेत. असे मानसन्मान माणसाला उच्च दर्जा असणाऱ्यांकडून मिळायला हवे





असतात व मिळतात. म्हणूनच मानचिन्हे देण्यासाठी नेहमीच प्रतिष्ठित व मोठे लोक निवडलेले असतात.

माणूस म्हणजे कोण व काय, याची नक्की व्याख्या करणे अवघड आहे, हे आपल्याला माहीत आहे. तशी व्याख्या करणे कठीण आहे, हे हेगेलला माहीत होते. माणूस हा एक प्राणी आहे. प्राणी ही संकल्पना बरीचशी स्थिर आहे. प्राणी हा बहुशः जीवशास्त्रीय, प्राणिशास्त्रीय घटकांनी, संदर्भांनी बांधलेला असतो. माणूसप्राणी मात्र काहीसा मुक्त असतो. माणूस ही कल्पनाच मुळी अस्थिर, चल, सर्जनशील आहे; माणूस स्वतःला घडवत असतो, स्वतःची निर्मिती करत असतो, स्वतःला रचत असतो, हे हेगेलचे मत विचार करण्यासारखे आहे. माणसाने बऱ्याच वर्षांच्या विकासानंतर, प्रगतीनंतर एक सिविल सोसायटी, एक नागरिक समाज निर्माण केला आहे.

माणसाचा आजवरचा इतिहास जरी हिंसेचा, क्रौर्याचा, जवळजवळ प्राणिशास्त्रीय प्रेरणांना जवळ असलेला असला, तरी आज माणूस विकासाच्या, प्रगतीच्या उन्नत टप्प्यावर पोचला आहे व त्याचा धीरोदात्तपणा, शौर्य, जोखीम घेण्याची आज असलेली त्याची तयारी कालानुरूप नवे रूप धारण करीत आहे, असे हेगेलला वाटत होते. टोळीप्रमुख, सरंजामदार, जमीनदार, राजा, सम्राट, हुकूमशहा, लष्करशहा या ऐतिहासिक अवस्थांमधून जात जात मनुष्याने आता लोकशाही अवस्था गाठली आहे. आता माणसांचे वर्ग स्पष्ट दिसू लागले आहेत. श्रमिक वर्ग हा आता वर्ग म्हणून जागृत झाला आहे व संघटित झाला आहे. आपले जमीनदार व भांडवलदारांकडून शोषण होत आहे, अशी त्याची सार्वत्रिक भावना आहे. आपले शोषण होते म्हणून श्रमिक वर्ग असमाधानी, तर जमीनदारांचा व भांडवलदारांचा वर्ग आपल्याला पुरेसा सन्मान दिला जात नाही व आपण मिळवत असलेला नफा अपुरा आहे असे वाटल्यामुळे असमाधानी. अशी असमाधानाची व वर्गविग्रहाची स्थिती आज असलेल्या परिस्थितीचे व व्यवस्थेचे पुढे टिकणे कठीण आहे हेच दाखवते, असे हेगेलला नीट जाणवले होते.

श्रम हे माणसाचे सत्त्व किंवा 'इसेन्स' आहे, असे हेगेलचे मत होते. ख्रिश्चॅनिटीमधला प्रोटेस्टंट पंथही तेच मानत होता. पण त्या दोन्ही मतांत एक अत्यंत मूलभूत फरक होता. तो फरक फार महत्त्वाचा होता. हेगेल इह-लोकातली श्रमावर आधारलेली स्वातंत्र्य व समता ही मानवी मूल्ये महत्त्वाची आहेत, असे मानत होता, तर प्रोटेस्टंट पंथीय श्रमाधारित पण परलोकातली स्वातंत्र्य व समता ही मूल्ये महत्त्वाची आहेत, असे मानीत होते.

श्रम या भौतिक जगातल्या स्वत्वापासून श्रमिक लोक दूर गेले आहेत; या जगातल्या उत्पादनपद्धतीमुळे व भांडवलदारांच्या नफेखोरीमुळे श्रमिक आपल्या स्वत्वापासून वियुक्त झाले आहेत—एलिअनेट झाले आहेत — असे हेगेलचे म्हणणे होते; तर प्रोटेस्टंट पंथाचे लोक आध्यात्मिक स्वातंत्र्य व समता मानीत होते, निरपेक्ष श्रम करणे हे आपले देवदत्त काम आहे, या विशेष कामाकरिता आपली निवड झाली आहे, असे प्रोटेस्टंटांना वाटत होते.

हेगेलला अर्थातच हे मान्य नव्हते. परलोकातल्या गोष्टी मानणे ही एक प्रकारची गुलामगिरीच आहे, असे त्याचे मत होते. देवकल्पना, धर्म, मिथके, प्रामाण्यवाद यांवर त्याचा विश्वास नव्हता. श्रमिकाने ज्ञान मिळवूनच आपली स्वजाणीव विकसित केली असून जमीनदार-भांडवलदार धन्याचा ऐदीपणा श्रमिकाने पाहिला आहे व नाकारला आहे, असे तो मानीत होता. लोकशाहीचे युग त्या श्रमिकानेच आणले. आता सामान्य लोकांची सिविल सोसायटी राज्यशासनावर दबाव आणून त्याचे नियंत्रण करेल, संघटित कृती करेल व राज्यशासनाला एक निश्चित दिशा देईल, याची त्याला खात्री होती.

मानवी स्वातंत्र्य ही कल्पना जरी फार जुनी असली, तरी तिला पाठबळ देणारी अर्थ व समाजव्यवस्था औद्योगिक क्रांतीनंतरच शक्य होती. दळणवळण साधनांतल्या प्रचंड क्रांतीमुळे हेगेलच्या कल्पना प्रत्यक्षात यायला मदत झाली. त्या कल्पना व विचार केवळ सैद्धान्तिक पातळीवर राहिले नाहीत. विवेकवाद प्रत्यक्षात आला. हुकूमशाहीचा पुरस्कर्ता ही हेगेलची लोकांसमोर असलेली एक प्रतिमा चुकीची आहे, असे फुकुयामाने आग्रहपूर्वक सांगितले आहे. हेगेल लोकशाहीचा पुरस्कर्ता होता या मतावर फुकुयामाने जोर दिला आहे.

समाजातल्या अंतर्विरोधावर मात करणारा समाज

व त्या समाजाची व्यवस्था यशस्वी व्यवस्था होते, असे हेगेल म्हणतो. उदाहरण म्हणून तो रोमन साम्राज्याच्या इतिहासाकडे बोट दाखवतो. रोमन साम्राज्याचा विनाश होण्याचे महत्त्वाचे कारण कायदेशीर समता व पुरेसे नागरिक हक्क यांतला अंतर्विरोध त्या साम्राज्याच्या समाजव्यवस्थेला सोडवता आला नाही. नागरिकांची प्रतिष्ठा त्या समाजाला राखता आली नाही.

त्या वेळच्या ख्रिश्चन धर्माने हा अंतर्विरोध संपवला. समता, न्याय, नागरी हक्क व मानवी प्रतिष्ठा या गोष्टी लोकांना देऊन हा अंतर्विरोध संपवण्यात तत्कालीन ख्रिश्चॅनिटी यशस्वी झाली व रोमन साम्राज्य संपले. ख्रिश्चॅनिटी आपला धर्म युरोपभर नेण्यात यशस्वी झाली.

हेगेलची भूमिका सत्त्वापेक्षा घडण्याला– बिकमिंगला - जास्त महत्त्व देणारी आहे. माणूस जे काही जन्माबरोबर घेऊन येतो, त्यापेक्षा या आयुष्यात तो काय करतो - म्हणजे तो कसा घडतो– हे महत्त्वाचे आहे, ही हेगेलची भूमिका स्वागतार्हच आहे. आपल्या जन्मजात गोष्टी काय आहेत व आपण काय करतो व आपल्याला काय करायचे आहे हे माणसाला जेव्हा समजते, तेव्हा त्याला आत्मभान येते किंवा तो स्वजाणीव प्राप्त करतो. तो त्या वेळी स्वतंत्र होतो. इतरांपेक्षा आपण कमी दर्जाचे नाही, हे त्याला उमजते. समतेची भावना त्याच्या मनात निर्माण होते.

व्यक्तीच्या बाबतीत हे जसे खरे आहे, तसे समाजाबाबतही खरे आहे. टोळीजीवन ते लोकशाही राज्यव्यवस्था हा मोठा प्रवास मानवी समाजाने केला आहे. आताच्या लोकशाही राज्यव्यवस्थेत विरोधाभास संपले असून माणसाने प्रगतीचा अखेरचा टप्पा गाठला आहे, द्वंद्वात्मकता संपली आहे, इतिहासाची अखेर झाली आहे, असे हेगेलला वाटले. जर्मनीतल्या जिनोच्या युद्धानंतर तिथे उदारमतवादी लोकशाहीची स्थापना झाली, तेव्हा हेगेलला असे वाटणे स्वाभाविक होते. स्वातंत्र्य व समता ही श्रेष्ठ मानवी मूल्ये आता प्रस्थापित झाली आहेत, इतिहासाने आता निश्चित दिशा घेतली आहे, हा वैश्विक स्वरूपाचा टप्पा आहे, असे त्याला वाटणे स्वाभाविक होते.

इतिहाससंबंधी मत व्यक्त करणारा हेगेलनंतरचा विचारवंत कार्ल मार्क्स (१८१८–१८८३) चर्चेसाठी घेणे योग्य ठरेल. त्याने हेगेलला अनुसरून पण फार वेगळा व भौतिकतेवर आधारित विचार मांडला. विरोधाभास -कॉन्ट्रॅडिक्शन-व द्वंद्वात्मकता-डायलेक्टिक्स-हे हेगेलचे दोन महत्त्वाचे मुद्दे त्याने आपल्या सिद्धान्तात घेतले. शिवाय त्याने हेगेलचाच इतिहासाच्या वैश्विकतेचा मुद्दा आपल्या पद्धतीने विचारार्थ घेतला.

सुरुवातीला माणसाचे टोळीजीवन, समूहजीवन होते व सर्व माणसांना एक समान दर्जा होता. पण लवकरच त्या वेळच्या लोकांच्या लक्षात आले की, समूहाला आज्ञा देणारा, समूहाचे भले सतत मनात वागवणारा प्रमुख पाहिजे. अशा रीतीने टोळीप्रमुख निर्माण झाले असावेत. कालांतराने त्यांना विशेषाधिकार दिले असावेत. त्यांचे उत्तराधिकारी कोण हे टोळीने ठरवले असणार. नंतर ते वारसाहक्काने ठरवले जाऊ लागले. माणूस एका जागी स्थिरावल्यावर व शेती करू लागल्यावर ज़मीनमालकी असणारा 'आहे रे' वर्ग व जमीनमालकी नसणारा 'नाही रे' चा वर्ग असे समाजाचे (वा मनुष्यटोळीचे) दोन वर्ग पडणे अगदी स्वाभाविक होते. या व्यवस्थेच्या पहिल्या टप्प्यात त्या व्यवस्थेला समृद्ध करण्यासाठी हे दोन्ही वर्ग झटले असतील; पण लवकरच त्यांच्या लक्षात आले असेल की, आपले हितसंबंध वेगळे आहेत. 'आहे रे' हा वर्ग अधिकाधिक नफा कसा होईल हे पाहत आहे, तर 'नाही रे' हा वर्ग आपल्या श्रमांचे योग्य मूल्य दिले जात नाही म्हणून नाखूश राहू लागला. वर्गविरोध व वर्गविग्रहाची बीजे अशा रीतीने प्राचीन समाजात पेरली गेली असतील, हा मार्क्सचा तर्क खरा दिसतो.

आपले शोषण होत आहे व आपणच निर्मिलेल्या गोष्टींपासून आपण एलिअनेट होत आहोत, वियुक्त होत आहोत, ही भावना श्रमिक वर्गात १७-१८ व्या शतकांत उदयास आलेल्या भांडवलशाहीच्या काळात अधिक तीव्र झाली. त्याआधी असलेल्या सरंजामशाही, जमीनदारी काळात, राजा ही संस्था असलेल्या व्यवस्थेत ती तितकी तीव्र नसणार. कारण 'आहे रे' वर्गातले जमीनदार व राजे प्रजेचे हित पाहत असतील, काळजी घेत असतील. शिवाय त्या वेळी श्रमविभागणी फारच

कमी प्रमाणात होती. श्रमिक आपण उत्पादित केलेल्या वस्तूपासून दुरावलेला नव्हता. ही त्या उपभोगवाद नसलेल्या समाजातील गोष्ट आहे. त्या वेळी वस्तूच फार प्रमाणात उपलब्ध नसल्याने दोन्ही वेगवेगळ्या वर्गांच्या राहणीमानांतला फरकही लक्षणीय नसणार.

मार्क्सने १९ व्या शतकाच्या मध्यानंतर आपला सिद्धान्त मांडला. त्या वेळच्या व्यवस्थेकडे, परिस्थितीकडे पाहून व भविष्यासंबंधी आडाखे बांधून व तर्क करूनच त्याने आपला सिद्धान्त मांडला असणार. त्याचा आशावाद असा होता की, श्रमिकांची क्रांती अटळ आहे, ती साऱ्या जगात होईल, त्या क्रांतीमुळे श्रमिकांचे शोषण थांबेल व त्यांची सत्ता जगात येणार व अर्थसत्ताही त्यांच्या हातात जाऊन गरजेवर आधारित अर्थव्यवस्था जगात तयार होईल. इतिहासाच्या विकासाच्या ओघात, इतिहासाच्या प्रगतीच्या दिशेने पुढे जाण्याच्या ओघात हे घडेल, असे मार्क्सला त्या वेळी वाटले. पण असे घडले नाही, हे आपल्याला दिसून आले.

हेगेलच्या विचारात आयडिआ ही अमूर्त, काहीशी अभौतिक गोष्ट त्याच्या सिद्धान्ताच्या केंद्रस्थानी होती, तर मार्क्सच्या सिद्धान्ताच्या केंद्रस्थानी भौतिक व आर्थिक विचार होता. स्वातंत्र्य, समता व समृद्धी ही मानवी मूल्ये मात्र दोघांच्या विचाराच्या अगदी मध्यभागी होती. वर्गसंघर्ष, क्रांती या गोष्टी मार्क्सला महत्त्वाच्या वाटल्या, तरी त्या काही काळापुरत्याच राहणार होत्या. अंतिम ध्येय मानवी श्रेय हेच होते. विकासामुळे ते साध्य होऊ शकते म्हणून विकास महत्त्वाचा, ही धारणा त्या दोघांचीही होती.

हे सारे स्थानकेंद्री नव्हते तर वैश्विक पातळीवरचे होते. काळाच्या ओघात माणूस घडत जातो (त्याच्या बिइंगपेक्षा त्याचे बिकमिंग अधिक महत्त्वाचे आहे हा विचार त्या दोघांच्याही विचारात महत्त्वाचा होता.), या गोष्टीला हेगेल व मार्क्स या दोघांच्याही विचारांत महत्त्वाचे स्थान होते. इतिहास हा वैश्विक स्वरूपाचा असतो, हे हेगेलचे मत मार्क्सला मान्य होते.

आजच्या समाजाची प्रगती झाली आहे, त्याने विकासाची वाट धरली आहे, हे स्पष्ट दिसत आहे. पण आजच्या समाजात समता नाहीये, विषमता वाढत आहे, हे पण खरे आहे. समाजाचे दैन्य कमी झाले आहे हे दिसत असताना या कंझ्युमरिस्ट वा भोगवादी आणि ग्राहककेंद्री समाजातली विषमता सर्वच विचारवंतांना बोचत असते. मार्क्सचा मानवी समतेचा विचार आता कालबाह्य झालाय का, याचाही गंभीर विचार करण्याची ही वेळ आहे. सर्वच लोकशाही राज्यव्यवस्थांना या आर्थिक व सामाजिक विषमतेच्या प्रश्नाला तोंड द्यावे लागत आहे. आर्थिक विषमता या सर्वच व्यवस्थांना स्वीकारावी लागत आहे, हे आजचे चित्र आहे.

(६)

फुकुयामाने या सर्व गोष्टींचा आपल्या पुस्तकात विचार केला आहे. समतेचा महत्त्वाचा मुद्दा त्याने नजरेआड केला नाही. समतेचा प्रश्न दुसऱ्या रीतीने पाहणे शक्य आहे, असे त्याला वाटले. प्लेटोच्या विचारातील थायमॉस ही कल्पना (थायमॉसला त्याने आत्म्याच्या तीन आत्मशक्तींपैकी एक आत्मशक्ती मानले होते.) आपल्याला दुसऱ्यांकडून मान मिळावा, दुसऱ्यांनी आपल्याला 'मोठा माणूस आहे' असे म्हणावे, या माणसाच्या स्वाभाविक व मूलभूत मानवी इच्छेशी तो जोडलेला आहे. फुकुयामाच्या मते औद्योगिक क्रांतीनंतर कौशल्ये, शिक्षण व सामाजिक गती या फार मोठ्या शक्ती बनल्या आहेत. या तिन्ही शक्ती ओळखूनच समतेचा प्रश्न पाहणे शक्य आहे. त्या थायमॉस या प्लेटोच्या कल्पनेशी जोडता येतील. आजच्या अर्थव्यवस्थेतही माणसाला मान्यता किंवा रेकग्निशन हवीच आहे. माणसाच्या थायमॉसच्या समाधानाची मानवी भूक आजही भागवायला लागेलच. आजच्या समाजातील उदारमतवादी लोकशाहीमध्ये एकाच वेळी माणसाची सन्मानाची गरज भागवायची व समताही पाळायची, ही तारेवरची कसरत करावी लागत आहे. श्रीमंतांकडच्या अतिरिक्त पैशाचा ओघ कररूपाने शासनाकडे वळवणे व तिथून गरिबांच्या गरजा भागविण्यासाठी गरिबांपर्यंत तो पोचवणे हे मोठे आव्हानात्मक काम आहे. श्रीमंतांना न दुखावता गरिबांना न्याय देणे, त्यांचा योग्य वाटा देणे, पुढे येण्याची संधी देणे व समानतेच्या दिशेने पुढे जाणे, हे मोठे आव्हान आजच्या शासनसंस्थेसमोर आहे.

मार्क्सवादी रशियात व चीनमध्ये समतेचा वेगळा

प्रयोग केला गेला. शासननियंत्रित व नियोजनाधारित अर्थव्यवस्थेचा हा प्रयोग होता. एकपक्षीय हुकूमशाहीचा हा प्रयोग रशियात १९१७ ते १९८९ पर्यंत चालवला गेला, तर चीनमध्ये १९४८ पासून अशी राज्यव्यवस्था राबवली गेली. १९८९ च्या रशियातल्या उदारमतवादी आर्थिक क्रांतीने हा मार्क्सवादी प्रयोग थांबला. रशियात लोकशाही राज्यव्यवस्था प्रस्थापित झाली. त्याआधी सक्तीने रशियातली अनेक राज्ये एकत्र ठेवली गेली होती. ती राज्ये १९८९ नंतर स्वतंत्र झाली. चीनमध्ये १९४८ पासून आजपर्यंत साम्यवादी राज्यव्यवस्था आहे. पण जागतिक उदारीकरण असलेली अर्थव्यवस्था उदयास आली व त्यानंतर चीनमधली अर्थव्यवस्था आमूलाग्र बदलली. राज्यव्यवस्था अगदी थोडीच बदलली. पण अर्थव्यवस्थेला बदलणे भाग पडले. जागतिक अर्थव्यवस्थेशी ती सुसंगत झाली व आपले असे स्थान तिने निर्माण केले.

हे सगळे घडले व घडत आहे. पण मानवजात एका उमद्या व मानवी चेहरा असणाऱ्या समाजव्यवस्थेकडे जात आहे, याबद्दल आपल्याला खात्री नाही. विसाव्या शतकात माणसाने विध्वंसक अशी दोन महायुद्धे अनुभवली. हिरोशिमा-नागासकीचे अणुस्फोट व त्यांचे दुष्परिणाम पाहिले, अनेक छोटी युद्धे पाहिली, धार्मिक पुनरुज्जीवनवाद, दहशतवाद, हिंसा व क्रौर्य आपण पाहत आहोत. त्यामुळे एक प्रकारचा निराशावाद विचारी मनात पसरणे स्वाभाविक आहे.

दुसऱ्या बाजूला दिसते की, व्यक्तीच्या उत्कर्षाची अमर्याद साधने उपलब्ध होत आहेत. मूलगामी प्रगत सोयी, आरोग्यविषयक व मनोरंजनाची असंख्य साधने निर्माण झाली आहेत. दळणवळण व माध्यमक्रांती जगाचे स्वरूपच बदलू पाहत आहे. पूर्वी कधी नव्हता तेवढा माणूस समृद्ध, स्वतंत्र झाला आहे. त्याला सुरक्षा, समान संधी व न्याय उपलब्ध होत आहे. विज्ञान व तंत्रज्ञानात सतत नवनवे शोध लागत आहेत. संस्कृतीचे क्षेत्र समृद्ध होत आहे. हे फारच आशावादी चित्र आहे.

स्थलकालाच्या मर्यादा माणसाने ओलांडल्या आहेत. शेतीजीवनवाला माणूस एका जागेला धरून होता, तिथे स्थिरावला होता. तिथली जीवनपद्धती तो अंगीकारत होता. आता अर्थव्यवस्थाच बदलल्याने नोकरीनिमित्त, कामानिमित्त तो आपले जन्मस्थळ सोडून स्थलांतर व देशांतर करू लागला आहे. अविकसित भागांतले, अविकसित देशांतले लोक विकसित भागांत व देशांत स्थलांतरित होत आहेत. दळणवळणाच्या अतिप्रगत साधनांमुळे हे शक्य झाले आहे. इंटरनेटमुळे ज्ञानक्रांती सुलभ झाली आहे. दोन भिन्न संस्कृती परस्परांना अधिक ओळखू लागल्या आहेत. मानवी व्यक्ती आता एका संस्कृतीला बांधून राहिली नाही. अनेक संस्कृतींची ओळख व्यक्तीला होत आहे. ह्या बदलाचे स्वागतच केले पाहिजे.

फुकुयामाने वैश्विक इतिहासाची कांट, हेगेल व मार्क्सने पुढे केलेली कल्पना प्लेटोच्या थायमॉस या कल्पनेशी जोडली. मानवी इच्छांचे समाधान करणे हा समान भाग या दोन्ही कल्पनांत आहे. शिवाय उदारमतवादी लोकशाहीतील खाजगी मालमत्ता धारण करण्याचा हक्क व सिविल सोसायटीची कल्पना हे दोन महत्त्वाचे भाग प्लेटोच्या थायमॉस कल्पनेशी सुसंगत आहेत.

इतरांनी आपल्याला मानावे ही माणसाची स्वाभाविक इच्छा थायमॉस या आत्म्याच्या भागाकडून येते; पण कधी कधी ही इच्छा वाईट व वेगळे वळण घेते. त्या वेळी काही माणसे अगदी दुष्टपणे वागतात. मोठी साम्राज्ये स्थापन करणारे भूतकाळातले सम्राट, सर्व काळांतले युद्धखोर नेते, हिटलरसारखे लष्करशहा व हुकूमशहा थायमॉसच्या वाईट उपयोगाची उदाहरणे आहेत. थायमॉसची चांगली बाजू माणसाला कार्यतत्पर बनवते, तर वाईट बाजू त्याला राक्षसी महत्त्वाकांक्षेचा, भल्याबुऱ्याचा विचार न करणारा अविचारी माणूस बनवते.

प्राचीन काळापेक्षा आजचा काळ वेगळा आहे. त्या वेळच्या माणसांचा युद्धज्वर, निष्ठुरता, क्रौर्य, हिंसकपणा, लढाऊ बाणा आजच्या उदारमतवादी लोकशाहीच्या काळात समर्पक व कालसुसंगत आहे का, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. आजच्या या व्यवस्थेत वंशवाद, प्रादेशिकतावाद, राष्ट्रवाद यांना मर्यादित महत्त्व आहे. स्वातंत्र्य, समता, मानवतावाद, दुसऱ्यांच्या व्यक्तित्वाबद्दल व मताबद्दल आदर बाळगणे हे सुसंस्कृतपणाचे लक्षण मानले जाऊ लागले आहे. पूर्वी असे नव्हते. आपण फार महत्त्वाचे व इतरांपेक्षा मोठे आहोत ही भावना– मेगॅलोमॅनिआ–

आता समर्थनीय नाही. आता मेगॅलोमॅनिआ ही भावना प्रस्तरारोहण, ऑलिंपिक खेळांच्या विविध स्पर्धा, शर्यती यांतून व्यक्त होत आहे. आताच्या या काळाची गरज म्हणून हे घडत आहे.

उपभोक्तावाद, जागतिक बाजारव्यवस्था यांमुळे नवी समाजव्यवस्था उदयाला येत आहे. विकसित देशांना हा बदल, हळूहळू का होईना, समजू लागला आहे. भविष्यात काय घडणार आहे, याची ही चाहूल आहे.

माणसाच्या जुन्या अस्मितांना आता नव्या वातावरणाशी जुळवून घ्यावे लागणार आहे. आजचे अविकसित देशांतले गरिबी, दैन्य, बेकारी, बेघरपणा, अल्पसंख्य व स्त्रियांकरिता अपुऱ्या असलेल्या सोयी हे प्रश्न लोकशाही सोडवेल, असा आशावाद पसरत आहे. उत्कर्षाची अमर्याद व असंख्य साधने व अनेक पर्याय आज उपलब्ध आहेत. आरोग्य, मनोरंजन साधनांत सतत प्रगती होत आहे. सर्वांना शिक्षण, समान संधी व सर्वांना विकासाची संधी यांमुळे श्रममूल्यांना प्रतिष्ठा प्राप्त होत आहे. पर्यायी विचारांबद्दल वादविवाद ह्या व्यवस्थेचे अभिन्न अंग असल्याने अतिरेकी धर्मवाद, अतिरेकी राष्ट्रवाद, अतिरेकी प्रादेशिकता यांना या व्यवस्थेत स्थान असणार नाही, असे फुकुयामाला वाटते. आजच्या अर्थकेंद्री माणसाला विवेकाचे आयुष्य जगायचे आहे, भूतकाळी गुण म्हणून गणल्या गेलेल्या शौर्य, धैर्य इत्यादींचा आजच्या संदर्भात फार वेगळा अर्थ घ्यावा लागणार आहे. संभवनीय असलेल्या अणुयुद्ध व जैविक युद्धाचे धोके सर्वांनाच समजले आहेत. तशी युद्धे टाळली जातील व नव्या युगाशी सुसंगत असे राजकारण आता जन्माला येईल, असे फुकुयामाचे मत आहे. निसर्ग ही माणसाने ओरबाडण्याची गोष्ट नाही हे समजल्याने निसर्ग माणसाचा विरोधक नाही, हे माणसाला पटेल व माणूस पर्यावरणपूरक गोष्टी करेल, याची खात्री फुकुयामाला वाटते. हेगेल व नित्शेने १९ व्या शतकाच्या चौकटीत आपले सिद्धान्तन केले होते. २१ व्या शतकातला माणूस या युगाला समर्पक होईल अशीच विचारांची चौकट उभारेल, यावर आपण भरवसा ठेवणे आवश्यक आहे. विसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकात फुकुयामाने जेव्हा हेगेलचा विचार प्लेटोच्या थायमॉस कल्पनेशी जोडला, तेव्हा त्याला समर्पकतेचा, कालसुसंगततेचा विचार अभिप्रेत असेल.

फुकुयामाच्या द एंड ऑफ हिस्टरी या पुस्तकाच्या संदर्भात काही मुद्दे इथे मांडणे योग्य होईल–

१) इतिहास एका निश्चित दिशेने पुढे जात असतो, त्याची प्रगती (म्हणजे माणसाची प्रगती) होत असते व येणारी राज्यव्यवस्था आधीच्या राज्यव्यवस्थेपेक्षा उन्नत व प्रगत असते हे कांट, हेगेल व मार्क्सचे मत (फुकुयामाने हेच मत स्वीकारले आहे.) केवळ एक सिद्धान्त, प्रमेय व तर्क या स्वरूपातच पाहणे योग्य होईल; त्याची सत्यता पडताळण्याकरिता भूतकाळातले पुरावे शोधणे योग्य होणार नाही.

२) अचानकपणे घडणाऱ्या घटनांमुळे इतिहास बदलला आहे, त्याला वेगळे वळण मिळाले आहे, हे भूतकाळात अनेकदा दिसले आहे. ते या सिद्धान्ताला बळ देणारे नाही. सतत विकसित होणाऱ्या विज्ञान व तंत्रज्ञानामुळे जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत अपरिवर्तनीय बदल होत आहेत. बाजारव्यवस्थेत मोठे बदल होत आहेत. नव्या श्रमविभागणीमुळे समाजरचनेवर मोठा परिणाम झाला आहे. वर्गव्यवस्था बदलत आहे. श्रेष्ठ-कनिष्ठ क्रमवारी बदलली आहे. सामाजिक संबंधांचे पुनःर्लेखन होत आहे. समाज काही क्षेत्रांत तरी एकसंध होत आहे. समाजातली वर्गव्यवस्थाच आज बदलत आहे, हे वास्तव नीट नोंदवले पाहिजे.

३) नवी उत्पादनपद्धती व नवी वाटपपद्धती आता निर्माण झाली आहे. तीमध्ये श्रमांचे वेगळ्या प्रकारे, कौशल्यपूर्ण व विवेकनिष्ठ संघटन झाले आहे. त्याचबरोबर लोकसंख्येचे सतत शहरीकरण, आधुनिकीकरण होत आहे; शिक्षणव्यवस्था विस्तारत आहे व बदलतही आहे, समकालीन माणसाची जीवनशैलीच बदलत असून, संयुक्त कुटुंबपद्धती जाऊन त्या जागी छोटी कुटुंबे निर्माण झाली आहेत. हे बदल आजतरी अपरिवर्तनीय वाटतात.

४) आर्थिक व राजकीय उदारीकरण आर्थिक घटकांवर व विवेकवादावर आधारलेले आहे. ते एखाद्या राजकीय विचारप्रणालीवर आधारलेले नाही. अर्थव्यवस्थेचा विकास हेच त्याचे मुख्य उद्दिष्ट आहे. गरिबांना रोटी देणे, त्यांना संधी उपलब्ध करून देणे, त्यांची बेरोजगारी हटवणे ही

ह्या नव्या व्यवस्थेची दुय्यम अग्रक्रम असलेली उद्दिष्टे असू शकतात. ही नवी अर्थव्यवस्था जागतिक स्वरूपाची असल्याने बऱ्याच साम्यवादी देशांना ती अनिच्छेने स्वीकारावी लागली व आपल्या आर्थिक धोरणात बदल करावे लागले.

आता फुकुयामासारख्या बऱ्याच विचारवंतांना वाटू लागले आहे की, समानतेचे, आर्थिक समाजवादाचे विचारवंतांचे आकर्षण बरेच कमी झाले आहे. अतिप्रचंड अशा उत्पादनपद्धतीमुळे, उपभोक्तावादामुळे व विविध पर्यायी उत्पादनांच्या उपलब्धतेमुळे आपल्या आजूबाजूचे वातावरण बदलले आहे, हे सहज लक्षात येते. नव्या विचारव्यूहाची आता गरज भासत आहे. फुकुयामाच्या द एंड ऑफ हिस्टरी या पुस्तकाकडे व त्यातील सिद्धान्ताकडे म्हणूनच नव्या चिकित्सक दृष्टीने पाहणे आवश्यक आहे.

- - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - -

टीप - फ्रान्सिस फुकुयामाच्या द एंड ऑफ हिस्टरी एँड द लास्ट मॅन या पुस्तकाची न्यूयॉर्कला फ्री प्रेस या प्रकाशन संस्थेने २००६ मध्ये प्रसिद्ध केलेली आवृत्ती इथे वापरली आहे. हे पुस्तक प्रथम १९९२ मध्ये प्रसिद्ध झाले.

* * *

अनुक्रमणिका

# गौडीय संप्रदायातील प्रेम - एक अनमोल सिद्धान्त

रोहन वेंगुर्लेकर

बंगालमध्ये चैतन्य महाप्रभू (इ. स. १४८५ ते १५३३) यांनी प्रथम प्रेमाचे प्रकटीकरण केले. ते कृष्णप्रेमामध्ये इतके बेभान होत की, जणू त्यांना कृष्णप्रेमाचे वेडच लागे. कृष्णप्रेमावरचा किंवा कृष्णासंबंधीचा एकही श्लोक ऐकला की, त्यांचे शरीर कंपित होत असे, अंगाला घाम सुटत असे, तसेच त्यांना मूर्च्छा येत असे. असे अष्टसात्त्विक भाव त्यांच्या शरीरावर प्रकट होत होते. अशा प्रकारे, कृष्णप्रेमाने भारलेले त्यांचे चरित्र असल्यामुळे स्वत: विद्वान असूनही त्यांना एकही ग्रंथ लिहिता आला नाही. पण त्यांनी त्यांच्या अनुयायांना जो उपदेश केला, त्याच्या आधारावर त्यांच्या अनुयायांनी ग्रंथनिर्मिती करून तत्त्वज्ञानाची एक बैठक तयार केली. त्या ग्रंथातून जी माहिती मिळते, तेच गौडीय तत्त्वज्ञान होय. हा गौडीय संप्रदाय चैतन्य महाप्रभूंपासून निर्माण झाला. तो आजतागायत चालू आहे. ह्या संप्रदायाची गणना वैष्णव संप्रदायात होते. चैतन्य महाप्रभूंनंतर येणाऱ्या सनातन, रूप, जीव, विश्वनाथ चक्रवर्ती, बलदेव विद्याभूषण ह्या त्यांच्या संप्रदायपरंपरेमध्ये येणाऱ्या अनुयायांनी या संप्रदायाचा साहित्यिक प्रसार केला. या अनुयायांनी ग्रंथनिर्मिती करून वेदान्त तत्त्वज्ञानाची एक बैठक तयार केली. म्हणूनच हा वेदान्ताचा अधिकृत संप्रदाय म्हणून गणला गेला. ह्या सर्व तत्त्वज्ञानाला व संप्रदायपरंपरेला गौडीय संप्रदाय असे मानले गेले आहे.

**भक्तिरसामृतसिंधु**

या वेदान्ताच्या विशिष्ट संप्रदायाने प्रेम हा सिद्धान्त जगाला देऊन साधनेची अनमोल देणगी जगाला दिली. 'प्रेम हीच साधना आणि प्रेम हेच साध्य' हे तत्त्व समोर ठेवून ह्या सांप्रदायिकांनी ग्रंथरचना केलेली आढळते. कृष्णप्राप्तीची साधना म्हणजे प्रेम आणि त्या साधनेद्वारे प्राप्त करायचे साध्य म्हणजे कृष्णप्रेम होय, अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाची शिकवण चैतन्य महाप्रभूंनी आपल्या शिष्यांना दिली. ह्या शिकवणुकीवर आधारून रूप गोस्वामी यांनी भक्तिरसामृतसिंधु या ग्रंथाची रचना केली. हा संपूर्ण ग्रंथ रससिद्धान्तावर आधारित आहे. ह्या ग्रंथामध्ये प्रेमभक्ती सिद्धान्त मांडण्यात आला आहे. रससिद्धान्ताच्या अन्य लेखकांनी म्हणजेच भरतमुनींपासून मम्मटापर्यंत सर्वांनी प्रेम हा सिद्धान्त प्राकृतिक जगतासाठी सांगितला आहे; पण रूप गोस्वामींनी तोच प्रेमसिद्धान्त कृष्णभक्तीला अनुसरून साधना या अर्थी घेतला आहे. प्रेमाचे निदर्शन कृष्णभक्तीला अनुसरून केले गेले आहे. हे सर्वप्रथम रूप गोस्वामींनी केले. त्यानंतर प्रेमाभक्ती, मधुराभक्ती ह्या संकल्पना रूढ झाल्या. ह्याच ग्रंथावर आधारून अन्य सांप्रदायिकांनीसुद्धा आपली ग्रंथरचना केली आहे.

भक्तिरसामृतसिंधु हा ग्रंथ रससिद्धान्तावर असल्याने त्याचे विवेचन इथे करीत नाही, पण गौडीय संप्रदायातील जीव गोस्वामी यांनी या ग्रंथाला आधारून तसेच वेदान्ताची बैठक घेऊन एक सुंदर ग्रंथ निर्माण केला; त्याचे नाव प्रीतिसंदर्भ असे आहे. त्याचेच संपूर्ण विवेचन ह्या लेखात करावयाचे आहे. म्हणूनचं लेखाला 'गौडीय संप्रदायातील प्रेम – एक अनमोल सिद्धान्त' असे सार्थ नाव दिले आहे.

**प्रीतिसंदर्भ या ग्रंथाविषयी**

प्रीतिसंदर्भ या ग्रंथाचे लेखक जीव गोस्वामी हे आहेत. यांनी षड्संदर्भ ग्रंथांच्या मालिकेत तत्त्व, भगवत्, परमात्मा, कृष्ण, भक्ती, प्रीती अशा ग्रंथांची रचना केली. यांमध्ये वेद, उपनिषदे व भागवत या ग्रंथांना अनुसरून वेदान्त तत्त्वज्ञान मांडण्यात आले आहे. म्हणजेच हे सहाही ग्रंथ वेदान्ताचे निदर्शक ग्रंथ आहेत. याच ग्रंथातील प्रीतिसंदर्भ हा सहावा म्हणजेच अंतिम ग्रंथ आहे. ह्यामध्ये प्रेमाची सर्वोच्चता साधन व साध्य हे प्रीतीच होय तसेच मुक्तीपेक्षा प्रीती श्रेष्ठ आहे, अशा प्रकारचे विवेचन केले आहे. म्हणूनच हा ग्रंथ विवेचनाला घेतला आहे. ह्यामध्ये आलेल्या विषयांतील मुद्द्यांची संगती समोर ठेवून नंतर क्रमशः विवेचन करतो.






(१) प्रस्तावना.
(२) परम पुरुषार्थ – प्रेम.
(३) मुक्तीपेक्षा प्रीती श्रेष्ठ.
(४) भगवत् प्रीतीचे स्वरूप.

असे विषय प्रीतिसंदर्भ या ग्रंथात आले आहेत. वरील मुद्द्यांद्वारेच प्रीतिसंदर्भ ग्रंथाला अनुसरून गौडीय संप्रदायातील प्रेमसिद्धान्तविवेचन करीत आहे.

**(१) प्रस्तावना**

ह्या ग्रंथाची सुरुवात म्हणजे प्रथम परिच्छेद ह्यातच ग्रंथाची प्रस्तावना केली आहे. प्रस्तावनेत स्पष्टपणे सांगितले आहे की, "मनुष्य सुखाची प्राप्ती आणि दुःखाची निवृत्ती यांसाठी प्रेम करतो."[१] यापुढे लेखकाचे असे म्हणणे आहे की, "परमतत्त्व श्रीकृष्णाची प्रीतीच सुखाची आत्यन्तिक प्राप्ती आहे आणि दुःखाची आत्यन्तिक निवृत्ती आहे."[२]

प्राकृतिक जगातले प्रेम हेसुद्धा सुख देते. प्रेम ही भावना मानवाच्या मनाला आनंद देणारी आहे. कोणताही माणूस सुखप्राप्तीसाठीच स्वाभाविकपणे प्रयत्न करीत असतो. माणूस प्रेम करतो तेसुद्धा सुखप्राप्तीसाठीच होय. सुखाची प्राप्ती म्हणजेच दुःखाची निवृत्ती असते. जर प्राकृतिक जगातले प्रेम सुखाची प्राप्ती करून देत असेल तर कृष्णप्रेम सुखाची प्राप्ती का करून देणार नाही, अशा आशयाची सुरुवात या ग्रंथाची आहे.

यापुढे जीव गोस्वामी तैत्तिरीय उपनिषदातील संदर्भ देऊन परमात्मा हा आनंदमय आहे, असे सिद्ध करतात. "परमात्मा म्हणजेच श्रीकृष्ण होय."[३] ह्या कृष्णप्रेमाच्या प्राप्तीने आनंद प्राप्त होणारच. प्रथम प्रेम हे सुखप्राप्तीसाठी केले जाते. त्याशिवाय श्रीकृष्ण हे आनंदमय आहेत. अशा आनंदाच्या दोन गोष्टी एकत्र आल्या तर जो आनंद निर्माण होणार आहे, तो किती असेल. ह्या आनंदाला समांतर आनंद तैतिरीय श्रुतीमध्ये दिला आहे. "मनुष्य आनंदापासून प्राजापत्य आनंदापर्यंत म्हणजेच ब्रह्मानंदापर्यंत आनंदाचे दहा भागांत विभाजन केले आहे. पहिल्यापासून दुसऱ्याचा आनंद शंभरपट आहे. अशा प्रकारे, प्राजापत्य आनंदापर्यंत कितीपट आनंद होईल."[४] एवढा सहस्रपट आनंद परमात्मा आनंद असतो. जर परमात्मा म्हणजे श्रीकृष्ण आनंदमय असतील तर त्यांचे प्रेम किती आनंदमय असेल, ह्याचे मोजमाप प्रीतीसंदर्भ या ग्रंथात तैतिरीय श्रुतीद्वारे करण्यात आले आहे.

प्रीतीच्या आनंदाचे मोजमाप झाल्यानंतर जीव गोस्वामी मुक्तीचे निरूपण करतात. ते म्हणतात, "परतत्त्वाचे साक्षात प्राप्त होणे हा मुक्ती शब्दाचा अर्थ आहे. कारण परतत्त्वाच्या आनंदाच्या अगोदर संसारबंधन तुटून जाते."[५] यापुढे जीव गोस्वामी लिहितात, "अच्युत नावाच्या परमात्म्याचा जिथे अनुभव प्राप्त होतो, तो त्याच्या आनंदाच्या अनुभवाच्या एकरूपतेमध्ये स्थित राहतो. त्या अवस्थेचे नाव आत्यंतिक प्रलय आहे. त्यालाच मुक्ती असे म्हणतात."[६] इथे मुक्ती म्हणजेच आनन्दप्राप्ती व आनन्दप्राप्ती ही प्रेमामुळे होते. म्हणजेच इथे प्रेमामध्ये किती सुख असते ते सांगितले आहे. शिवाय मुक्ती आणि प्रीतीचा अभेद दाखविला आहे. मुक्ती तीच जी प्रीतीनंतर प्राप्त होते. म्हणूनच मुक्ती म्हणजे प्रेम आणि आत्यंतिक प्रलय म्हणजे प्रीती. शिवाय जे आहे त्याचा प्रलय सांगितला आहे.

**(२) परमपुरुषार्थ-प्रेम**

धर्म, अर्थ, काम, मोक्ष असे चार पुरुषार्थ वैदिक वाङ्मयात सांगितले आहेत. त्यांपैकी मोक्ष म्हणजेच मुक्ती. या पुरुषार्थाचे वर्णन जीव गोस्वामींनी जे केले आहे, त्याचेच परत थोडक्यात स्पष्टीकरण करतो. "जिवंत असतानाही साधकांना मुक्ती प्राप्त होते तसेच मेल्यावरही मुक्ती प्राप्त होते. ह्या दोन्ही प्रकारच्या मुक्तींना आत्यंतिक पुरुषार्थरूपात निरूपित केले आहे."[७] इथे मुक्ती ह्या पुरुषार्थाचे निरूपण झाले. जसे चवथा पुरुषार्थ मोक्ष आहे, तसेच पंचम पुरुषार्थ प्रेम हा आहे. ह्या पाचव्या पुरुषार्थानेच पहिल्या चार पुरुषार्थांना किंमत प्राप्त होते. किंबहुना ह्या पाचव्या पुरुषार्थाने इतर चार पुरुषार्थांना सौंदर्य प्राप्त होते. हे सौंदर्य प्रदान करण्याचे कार्य गौडीय संप्रदायाने केले. संपूर्ण समाजाला पंचम पुरुषार्थ प्रेमाची सौंदर्यवादी देणगी देण्याचे कार्य गौडीय संप्रदायाने केले. तसेच गौरांग देवांनी आपल्या आचरणाद्वारे दाखविले. तोच पंचम पुरुषार्थ जीव गोस्वामींच्या शब्दांत इथे निरूपित करत आहे.

"प्रीती, भक्ती इ. नावांनी त्यांचे जे प्रियत्व लक्षण धर्मविशेष आहे, त्याचा साक्षात्कार किंवा अनुभव करणेच






परम श्रेष्ठ मानले गेले आहे."[८] श्रीकृष्णाला प्रिय असलेली गोष्ट म्हणजे प्रेम होय. ज्या वेळी कृष्णप्रेम प्राप्त होते, त्या वेळीच साक्षात्कार प्राप्त होतो. पण कृष्णप्रेम कशा प्रकारचे असल्यावर साक्षात्कार प्राप्त होतो, याचे निरूपण जीव गोस्वामी करतात. "उपाधिरहित प्रीतीच्या आश्रितच सुख राहते. म्हणूनच परमतत्त्वाच्या अनुभवाच्या साक्षात्कारामध्येच प्रीती प्रधान कारण आहे. म्हणूनच माणसाला त्याच प्रीतीचा शोध घेतला पाहिजे. तेच माणसाचे परमतम प्रयोजन आहे."[९] इथे प्रीती ही कोणत्याही अभिलाषेशिवाय आणि अखंड असेल तरच परमतत्त्वाचा अनुभव करून देते. इथे हेच सांगण्यात आले आहे की, प्रीती हाच परमपुरुषार्थ आहे. ही प्रीतीच कृष्णाजवळ घेऊन जाते. म्हणून पंचम पुरुषार्थ या अर्थी प्रीतीची स्थापना केली गेली आहे.

तत्त्वमसि हे वेदान्ताचे वाक्यसुद्धा प्रेमपूरकच आहे, असे जीव गोस्वामी सांगतात. तत्त्वमसिचा अर्थ ते तू आहेस. ते म्हणजे कृष्ण. तू म्हणजे जीव. ज्या वेळी प्रेम प्राप्त होते, त्या वेळी कृष्ण आणि जीव यांचे मिलन झालेले असते. दोघेही एकरूप झालेले असतात. म्हणजेच दोघे एकच असतात. म्हणून ते तू आहेस याचा अर्थ तू कृष्णप्रेमाने बांधला गेला आहेस, असा होतो. तत्त्वमसि याचा अर्थ स्पष्ट करताना जीव गोस्वामी सांगतात, प्राकृतिक जगातसुद्धा प्रीति-पूरकच संबंध आहे. सर्व प्राणी प्रेमासाठीच कार्य करीत असतात. प्राण्यांमध्ये आपापसात प्रेमाचे जे नाते असते, ते अभेदात्मकच असते. त्यामुळे सर्वश्रेष्ठ जी भगवत्प्रीती आहे, ती तत्त्वमसि ह्या वाक्याने दर्शविली आहे. तसेच भगवत्प्रीती म्हणजेच पंचम पुरुषार्थ होय. पुढे जीव गोस्वामी लिहितात, संपूर्ण जग हे प्रेमासाठीच आसुसलेले आहे. मनुष्य काय किंवा प्राणी काय, एकमेकांवर प्रेमासाठीच अवलंबून आहेत. पण जीव गोस्वामी म्हणतात, जागतिक पदार्थावरची प्रीती अस्थायी आहे. त्या पदार्थावरील प्रेमाने कोणी तृप्त होऊ शकत नाही. कारण हे जग नवनवीन पदार्थांशी प्रीती जोडते, त्या वेळी जुन्या पदार्थांची प्रीती तुटुन जाते. म्हणूनच भगवान श्रीकृष्णच प्रीतीचे एकमात्र अधिष्ठाते आहेत. याचकरिता मनुष्याने भगवत्प्रीतीचाच शोध घेतला पाहिजे. तोच परमपुरुषार्थ आहे.

'भगवत्प्रीती ही परमपुरुषार्थ आहे', ह्या सिद्धान्ताची स्थापना करताना जीव गोस्वामी लिहितात, "सर्व उपनिषदांचे सार ब्रह्म आहे. जीवात्मा त्या ब्रह्माचा अंश आहे. म्हणून या दोघांचे एकत्व आहे. एकच शुद्ध परमपुरुषार्थ हाच श्रीमत्भागवताचा प्रतिपाद्य विषय आहे. भागवताच्या आविर्भावाचे प्रयोजनच फक्त शुद्ध परमपुरुषार्थ स्थापन करणे आहे. कैवल्य म्हणजे शुद्ध भाव किंवा शुद्ध भगवत्प्रीतीचे प्रतिपादन करणेच श्री भागवताच्या आविर्भावाचे प्रयोजन आहे."[१०] जीव गोस्वामी इथे श्रीमत्भागवताचा श्लोक उद्धृत करून भागवताचा प्रतिपाद्य विषय स्पष्ट करीत आहेत. कैवल्य म्हणजे मोक्षच भागवताचा प्रतिपाद्य विषय आहे. ज्या वेळी कृष्णप्रेमाची प्राप्ती होते त्या वेळी कैवल्य आपोआप प्राप्त होते. म्हणजेच भगवत्प्रीती हेच कैवल्य आहे काय, असा प्रश्न पडतो. पण प्रीती म्हणजे कैवल्य नव्हे. प्रीती आनंदाची प्राप्ती करून देते व कैवल्यसुद्धा आनंदाची प्राप्ती करून देते. मग दोहोत फरक काय? कैवल्य प्राप्त झाल्यावर भौतिक क्लेश उरत नाहीत. प्रीतीमध्ये तसे नसते. पण भौतिक क्लेश असूनसुद्धा प्रीतीचा आनंद त्यास झाकतो. म्हणून क्लेश जाणवत नाहीत. त्याचप्रमाणे प्रीती ही सौंदर्य प्रदान करते, तर कैवल्यामध्ये रूक्षताच अधिक दिसून येते. अशा प्रकारचा फरक प्रीती आणि कैवल्यात दिसून येतो. कैवल्य प्राप्त झाल्यावर प्रीती प्राप्त होईलच, असे नाही. पण प्रीती प्राप्त झाल्यावर आवश्यक असल्यास लगेचच कैवल्य प्राप्त होईल. प्रीतीचे हेच वैशिष्ट्य आहे. म्हणजे भगवत्प्रीतीचे हे वैशिष्ट्य आहे की, ती सर्वसमावेशक अशी व्यापक आहे. म्हणूनच प्रीती ही कैवल्यापेक्षाही श्रेष्ठ मानली गेली आहे.

**(३) मुक्तीपेक्षा प्रीती श्रेष्ठ**

जीव गोस्वामी मुक्तीचे वर्णन करताना म्हणतात, "जरी भगवत्प्रीतीशिवाय मुक्ती होऊच शकत नाही, तरीसुद्धा मुक्षुक्षूमध्ये, आपल्या दुःखाच्या निवृत्तीमध्ये आणि सामीप्यादी संपत्ती प्राप्त करण्यासाठी मुक्तीचेच तात्पर्य राहते. त्यांचे तात्पर्य भगवंतामध्ये राहत नाही. त्यामुळे त्यामध्ये भगवत्प्रीतीची कमी राहते. 'कैवल्य मुक्ती' हेच एकमात्र भागवताचे प्रयोजन आहे. ह्याचे तात्पर्य भगवत्प्रीतीमध्ये आहे."[११] ज्यांना मुक्ती प्राप्त करायची

अनुक्रमणिका

आहे, ते भगवत्प्रीतीचा साधन या अर्थी वापर करतात. त्यांच्या दृष्टीने प्रीतीद्वारे मुक्ती प्राप्त करायची म्हणजेच मुक्ती हेच अंतिम साध्य आहे. म्हणूनच ते प्रीतीला साधन बनवितात. पण भगवत्‌भक्तासाठी तसे नसते. त्यांच्यासाठी प्रीती ही प्रीतीसाठीच केली जाते. मुक्ती ह्या उद्दिष्टाचे स्थान गौण असते. किंबहुना मुक्तीला काहीही किंमत नसते. तिथे प्रीती हीच श्रेष्ठ गणली गेलेली असते. ह्यावरून हे स्पष्ट होते की, मुक्तीपेक्षा प्रीती श्रेष्ठ आहे.

मुक्ती म्हणजे एकप्रकारे स्वार्थाचे लक्षण होय. कारण मुक्ती ही वैयक्तिक आहे. मुक्तीमध्ये फक्त स्वतःच्याच आनंदाचा विचार केला जातो. तसे प्रीतीमध्ये नाही. प्रीतीमध्ये स्वतःचा आनंद तर असतोच; पण त्यापेक्षा आपण ज्याच्यावर प्रेम करतो, त्यालासुद्धा आनंद प्राप्त होतो. प्रीतीमध्ये आपण ज्याच्यावर प्रेम करतो, त्याच्याच आनंदाचा विचार केला जातो. यालाच निःस्वार्थी भक्ती किंवा प्रीती असे म्हणतात. नित्य निरंतर अखंडपणे ही प्रीती प्राप्त होण्यासाठी भक्ताचे मन आसुसलेले असते. ही अहेतुक प्रीती मुक्तीपेक्षासुद्धा श्रेष्ठ ठरते. हाच सिद्धान्त सिद्ध करण्यासाठी जीव गोस्वामी भागवतातील श्लोक देऊन स्पष्ट करतात. (भा. ३. १५. ४९) "भगवन्, जर आमचे चित्त भ्रमराप्रमाणे आपल्या चरणकमळांशीच रममाण होईल, आमची वाणी तुळशीप्रमाणे आपल्या चरणकमलांच्या वर्णनामुळे सुशोभित होईल आणि आमचे कान आपल्या सुयशरूप अमृताने परिपूर्ण होतील, तर आमच्या पापांमुळे आमचा जन्म नरकादी योनीत होऊ दे. त्याची आम्हाला चिंता नाही. ह्या न्यायाने त्याचे एक मात्र अनुशीलन तात्पर्य प्रीती हीच विश्रांती होय. म्हणूनच कैवल्यापेक्षा, मोक्षापेक्षा श्रेष्ठ जे भगवत्प्रीतिलक्षण आहे, तेच भागवताचे प्रयोजन आहे."[१२] भक्त प्रीतीसाठी नरकातसुद्धा जायला तयार आहे. भक्त म्हणतो, आम्हाला मुक्ती मिळाली नाही तरी चालेल. याउलट, आम्ही नरकात गेलो तरी चालेल; पण आमच्यापासून प्रीती दूर जाऊ नये. कृष्णप्राप्तीपेक्षाही कृष्णप्रेम श्रेष्ठ आहे. मग तिथे मुक्तीची काय किंमत? हे अशा प्रकारचे प्रेम गोपींनी व राधेने दाखविले आहे. श्रीकृष्ण सोडून गेल्यानंतरही त्यांचे प्रेम वृद्धिंगतच होत राहिले. हेच विरहातले प्रेम आहे. ह्या प्रेमापुढे मुक्तीदेखील हीन ठरते. हेच जीव गोस्वामी ह्या परिच्छेदात सांगत आहेत. त्याचबरोबर असे सांगितले गेले आहे की, "भगवान श्रीकृष्ण मुक्ती तर प्रदान करतील; पण प्रेम प्रदान करणार नाहीत."[१३]

### (४) भगवत्प्रीतीचे स्वरूप

"विषयप्रीतीचे जे लक्षण आहे, तेच भगवत्प्रीतीचे लक्षण आहे. पण विषयप्रीती भगवत्प्रीती नाही. ह्या प्रीतीचे लक्षण विषयप्रीतीसारखेच वर्णित होईल. पण दोन्हीमध्ये महदंतर आहे. कारण की, विषयप्रीती मायाशक्तीची वृत्ती आहे, तर भगवत्प्रीती स्वरूपशक्तीची वृत्ती आहे, हाच मुख्य भेद आहे."[१४]

प्रेम म्हणजे मनाची ती अवस्था, जी माणसाला मोहरून टाकते. प्रीतीमध्ये सर्व इच्छा, आकांक्षा संपतात. तिथे एकच इच्छा मनामध्ये प्रकटित झालेली असते. ती म्हणजे प्रियतमेच्या अतिशय ओढीची; प्रियतमेचा ध्यास घेऊन तो मनुष्य जगत असतो. त्याचे मन तिच्यासाठी इतके क्षुल्लक बनलेले असते, की ते मातीच्या धूलीकणाइतके बनते. त्याचे तिच्यासाठी आसुसलेपण तो मनात शमवू शकत नाही. प्रियकराचे प्रियतमेमध्ये गुंतून रहाणे आणि सारखा सारखा तिचा आठव करणे, तसेच तिच्याशिवाय कोणतेही कार्य सुचत नाही, हेच भौतिक प्रीतीचे स्वरूप आहे. असेच स्वरूप भगवत्प्रीतीचे-सुद्धा आहे. पण भगवत्प्रीती भगवंताच्या आनंदासाठी केली जाते. भौतिक प्रीती ही उपभोगासाठी केली जाते. तर भगवत्प्रीती ही भक्तीसाठीच केली जाते. जी प्रेमयुक्त भक्ती आहे तीच प्रीती होय. ज्या भगवत्भक्तीमध्ये प्रेम आहे तीच प्रीती होय. भगवत्प्रीतीबद्दल जीव गोस्वामी लिहितात, "श्रीभगवत्प्रीती निखिल परमानन्द चंद्रिकेचा चंद्रमा आहे. सर्व भुवनांच्या सौभाग्य साराचे सर्वस्व आहे. प्रीती कोणत्याही विधीची अपेक्षा ठेवत नाही. स्वभावानेच ती योग्य आनंदाला प्राप्त करते. ती कोणत्याही इतर विषयाने खंडित होत नाही. ती श्रीकृष्ण सोडून इतर अन्य विषयांमध्ये रममाण होत नाही. भगवत्प्रीती हलादिनी सार आहे. ती भगवत् अनुकूलतेलाच प्राधान्य देणारी आहे. भक्तांच्या आत्मरहस्याचे संगोपन याचा गुणमय चंद्रहार आहे. तसेच नेत्रादी अश्रू यांची भूषण

आहे. सर्व गुणांना आपल्यामध्ये समाविष्ट करणे हिचा गुण आहे. ही प्रीती भगवंताच्या मनाला आकर्षित करणारी आहे."[१५] याचा अर्थ सर्वश्रेष्ठ आनंद देणारी अशी भगवत्प्रीती आहे. ती सर्व भुवनांच्या म्हणजे चौदा भुवनांपेक्षाही श्रेष्ठ आहे. भगवत्प्रीतीमध्ये कोणताही विधी नाही. ती स्वाभाविकपणे प्राप्त होते. मनाची अशी नित्य निरंतर अवस्था बनते की, त्यात शुद्धत्व येते. त्यामध्ये चित्ताच्या वृत्तीचा निरोध करण्याची आवश्यकताच नसते. कारण चित्त शुद्ध झालेले असते. त्यामध्ये कामादी विकार नसल्याने आपोआपच मनाची चंचलता निघून गेलेली असते. नेहमी आणि सतत भगवंताचाच आठव असल्याने त्यात शुद्धत्व येते. म्हणूनच ती आनंदमय असते. प्रीतीच्या ह्या आनंदाच्या स्तरावर मनुष्य एकाच गोष्टीचे चिंतन करीत असतो. ते म्हणजे आपला प्रियतम भगवंत आणि त्याचे प्रेम हे होय. प्रेमाचे हे नित्यत्वच शुद्धत्व प्रदान करत असते. त्यामुळे अन्य विषय किंवा विकार प्रीतीपुढे तुच्छ होतात. ह्या विकाररहिततेमुळे मनाला जे सौंदर्य प्राप्त होते, तेच भगवत्प्रीतीचे स्थान होय. प्रीती ही अशा चंचलरहित मनात राहिल्यामुळे स्वाभाविकपणे ती भगवंतांना आकर्षित करते. ज्या हृदयात भगवंत राहतात तिथे इतर कोणत्या गोष्टींना स्थान असणार? भगवंतसुद्धा अशा प्रीतीचे भुकेले असतात. ह्या प्रेमी भक्तापुढे भगवंत आपले हृदय विकतात. ते सर्वस्वी भक्ताधीन बनतात. त्यामुळे भगवंत भक्ताचे दास व्हायलासुद्धा तयार होतात. ह्यामध्ये भक्त आणि भगवंत प्रेमाने बांधले जातात. ह्या प्रीतीमुळेच दोघांतले द्वैत मिटून अद्वैत प्रस्थापित होते. भक्त भगवंतमय होऊन प्रेमाने न्हाऊन निघतो. ह्या प्रेमाच्या उच्चतेमुळे त्याच्या नेत्रांतून अश्रू वाहतात, अंगावर रोमांच उभे राहतात कंठ सद्गदित होतो, शरीर कंपायमान होते. असे अष्टसात्त्विक भाव त्याच्या शरीरावर उमटतात. हेच खरे प्रीतीचे अलंकार आहेत. हे अलंकार प्राप्त झाल्याने भक्ताला सौंदर्य प्राप्त होते. ह्या भक्ताच्या सौंदर्यावर भाळून भगवंत आकर्षित होतात. ही भगवत्प्रीती म्हणजे हलादिनी होय. जी हलादिनी भगवंतांना आनंदित करते, ती हलादिनी भक्तालासुद्धा आनंदित करते. भक्त, भगवंत आणि भक्ती ही त्रिपुटी जिथे संपुष्टात येते, तिथेच हलादिनी सारविशेष प्रेम प्राप्त होते.

भौतिक प्रीतीमध्ये हे गुण दिसून येत नाहीत. कारण भौतिक प्रेम हे विषयांशी संबंधित असते. तिथे चित्ताच्या वृत्तीचा निरोध झालेला नसतो. तिथे प्रेमामध्ये नित्यत्व जरी असले तरी मनाची चंचलता गेलेली नसते. भौतिक प्रेमामध्ये अष्टसात्त्विक भाव हे विषयांशी संबंधित राहतात. विकारातून उद्भवलेले भाव हे प्रेमाची शुद्धता प्राप्त करून देऊ शकत नाहीत. असा फरक भौतिक प्रीती आणि भगवत्प्रीती यांमध्ये असतो. त्यामुळे भगवत्प्रीती श्रेष्ठ ठरते. हेच भगवत्प्रीतीचे स्वरूप होय.

**उपसंहार**

गौरांगदेवांनी ज्या प्रीतीचा उपदेश रूप गोस्वामी आदी शिष्यांना दिला होता, तसेच गौरांगांनी ज्या प्रेमाचे प्रदर्शन सर्वांना दाखविले होते, त्याचेच सैद्धान्तिक निरूपण भक्तिरसामृतसिंधु आणि श्रीमत्भागवताच्या अनुषंगाने जीव गोस्वामींनी प्रीतीसंदर्भ या ग्रंथात मांडले आहे. ह्या ग्रंथाचे विशेष म्हणजे वेदान्ताच्या ज्ञान, ध्यान, भक्ती व कर्म ह्या साधनांमध्ये प्रीती ह्या नवीन साधनेची भर घातली गेली. ह्या चारही द्वारे परब्रह्म परमात्म्याला जसे प्राप्त करायचे तसेच सहजसुलभ आणि स्वाभाविकपणे प्रेमाद्वारे भगवंतांना प्राप्त करायचे, हेच गौडीय संप्रदायाने दाखवून दिले आहे. गौडीय संप्रदायाचा प्रेमसिद्धान्त ज्या ग्रंथामध्ये प्रकट झाला, तो प्रीतीसंदर्भ हा ग्रंथ, त्याचेच निरूपण ह्या लेखात केले गेले आहे. ह्यातून हे सांगण्याचा प्रयत्न केला आहे की, भगवत्प्रेम हे सुलभ व स्वाभाविक आहे. तसेच आज माणूस सर्वाधिकपणे आसुसलेला असतो, तो प्रेमासाठी. कारण आनंदाची अभिलाषा तर सर्वांनाच असते. तो आनंद भगवत्प्रेमामध्ये जितका आहे, तितका अन्य कशातही नाही.

**संदर्भ**

१. प्रीतीसंदर्भ - परिच्छेद १, पृष्ठ २.
२. तत्रैव.
३. परमात्मा संदर्भ - परिच्छेद १५, पृष्ठ ३६.
४. प्रीतीसंदर्भ - परिच्छेद १, पृ. २.
५. तत्रैव - परिच्छेद १, पृ. ६.
६. तत्रैव - परिच्छेद १, पृ. ६.
७. तत्रैव - परिच्छेद १, पृ. ११.
८. तत्रैव - परिच्छेद १, पृ. ११.

९. तत्रैव - परिच्छेद १, पृ. ११.
१०. तत्रैव - परिच्छेद १, पृ. १५.
११. तत्रैव - परिच्छेद १६, पृ. ७६.
१२. तत्रैव - परिच्छेद १६, पृ. ७६.
१३. तत्रैव - परिच्छेद १७, पृ. ८१.
१४. तत्रैव - परिच्छेद ६१, पृ. १२८.
१५. तत्रैव - परिच्छेद ७७, पृ. १६४.

* * *

# सं. मानापमान–सौभद्रचे संयुक्त प्रयोग आणि मराठी रंगभूमी

मेधा सिधये

'संगीत नाटक ही मराठी रंगभूमीने जागतिक रंगभूमीला दिलेली एक श्रेष्ठ देणगी आहे', हे सुप्रसिद्ध नाट्यनिर्माते आणि आधुनिक भारतीय रंगभूमीवरील श्रेष्ठ विचारवंत श्री. अल्काझी यांचे विधान सर्वमान्य असून वेळोवेळी त्याचा उल्लेख केला जातो. मराठी रंगभूमीचा १८४३ मध्ये जन्म झाला तोच मुळी संगीताचे बोट धरून. १८८० मध्ये कै. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या 'शाकुंतल' ने क्रांती घडवली. तिचाही प्राण संगीतच होते. तेव्हापासून ते गंधर्वयुगाच्या अस्तापर्यंत मराठी रंगभूमी संगीताने गाजवली. गद्य नाटककार, नाटके आणि अभिनयकुशल नट होतेच; पण गायकनटांची लोकप्रियता त्यांना लाभली नाही, अशी खंतही व्यक्त केली गेली. पंचेद्रियांपैकी डोळे आणि कान यांची तृप्ती करणारे रंगभूमीवरील गायकनट गोड गळा, तयारीचे गायन, मोहक रूप यांच्या बळावर प्रेक्षकांना मंत्रमुग्ध करीत होते. इतके की, यात नाट्यात्मकतेचा बळी दिला जातो आहे, हे कोणाच्याच ध्यानात आले नाही. किंवा लोकप्रियतेच्या मोहाने कोणी तिकडे लक्ष दिले नाही. धाकट्या शास्त्रीबोवांनी मात्र इशारा दिला होता.

एक वेळ अशीही येऊन ठेपली की, संगीताने मराठी रंगभूमी तारली की मारली? नाटक आणि संगीत यांचे नाते कसे असावे? रंगभूमीच्या संदर्भात महत्त्वाचे काय -गायन की अभिनय? संगीतनाट्यलेखनाच्या मर्यादा कोणत्या? त्यातून व्यापक जीवनदर्शन घडते का? अशा अनेक प्रश्नांचा ऊहापोह होऊ लागला. संयुक्त नाट्यप्रयोगांमुळे आणखीही काही प्रश्न निर्माण झाले, काही हानिकारक दूरगामी परिणाम झाले. म्हणूनच सं. मानापमान आणि सं. सौभद्र या दोन संयुक्त नाट्यप्रयोगांचा विचार महत्त्वाचा ठरतो.

बालगंधर्व आणि केशवराव भोसले या दोघांनी एकत्र येऊन केलेल्या या संयुक्त प्रयोगांची तटस्थ समीक्षा एकूण मराठी नाट्यविचाराला पोषक ठरू शकेल. या प्रयोगांविषयी या दोन्ही श्रेष्ठ नटांच्या बाजूने किंवा विरुद्ध खूप लिहिले गेले आहे. सर्वच विधानांची सत्यासत्यता आता, काळाच्या अंतरामुळे पडताळून पाहणे शक्य नाही पण मराठी रंगभूमीच्या दृष्टीने या दोन संयुक्त नाट्यप्रयोगांचे कोणते दूरगामी परिणाम झाले? यातून रंगभूमीवरील नट, नाट्यविषयक वातावरण, प्रेक्षकांची अभिरुची यांवर कोणता प्रकाश पडतो? मराठी रंगभूमीवर जातीयता होती का? नाट्यसंस्थांमधील वातावरण, त्या संस्थांचे परस्परसंबंध निकोप होते का? अशा काही प्रश्नांचा विचार करता येईल.

मराठी रंगभूमीचा विचार करताना संयुक्त प्रयोगांकडे लक्ष वेधले; कारण 'संयुक्त मानापमान' हा मराठी रंगभूमीच्या शंभर वर्षांतल्या कर्तृत्वाचा, लौकिकाचा, लोकप्रियतेचा आणि वैभवाचा कळस मानला गेला आहे. नाटक एक कलाप्रकार, प्रेक्षकांची अभिरुची या दृष्टीने हा खरेच उत्कर्षबिंदू होता की पतनाची चाहूल होती? रंगभूमीवरील उत्कृष्ट गायन म्हणजेच कर्तृत्व का? गायक नट म्हणून मिळणारी लोकप्रियता हा नट म्हणून मानदंड मानायचा का? वैभवाचा कळस म्हणजे कोणत्या वैभवाचा? दिमाखदार नेपथ्य, शालू-शेले, अत्तरांचा घमघमाट, दागदागिने की प्रयोगांच्या उत्पन्नाचे आकडे? संगीत ही एक अतिशय श्रेष्ठ कला आहे; पण रंगभूमीचे ते एक अंग आहे. 'नाट्य' हा रंगभूमीचा आत्मा आहे आणि संगीत, चित्र, नृत्य, शिल्प इ. कला आणि आजच्या तंत्रयुगात ध्वनिसंयोजन, प्रकाशयोजना, नेपथ्य ही रंगभूमीवरील नाट्याला पोषक अशी कलाकौशल्ये आहेत. या सगळ्याचा सु-मेळ रंगभूमीवरील 'खेळ' जिवंत करतो.

'संयुक्त नाट्यप्रयोगां'च्या 'खेळा' मध्ये ज्यांची जुगलबंदी घडवून आणली, ते 'ललितकलादर्श' चे केशवराव भोसले आणि 'गंधर्व नाटक मंडळी'चे बालगंधर्व हे मराठी संगीत रंगभूमीवर आपल्या तेजाने चमकणाऱ्या हिऱ्यांपैकी दोन हिरे होते. या उभयतांना एकाच रंगमंचावर

आणण्यामागची, मानापमान आणि सौभद्र हीच दोन नाटके या संयुक्त प्रयोगांसाठी निवडण्यामागची पार्श्वभूमी ध्यानात घेतली पाहिजे.

१९०८ मध्ये केशवराव भोसले यांची 'ललितकलादर्श' आणि १९१३ मध्ये बालगंधर्वांची 'गंधर्व नाटक मंडळी' स्थापन झाली. बालगंधर्वांनी १९१३ पूर्वीच म्हणजे 'किर्लोस्कर नाटक मंडळी'त असतानाच खूप नावलौकिक आणि लोकप्रियता मिळवली होती. केशवरावांनी स्थापनेपासून दहा-बारा वर्षांतच 'ललितकलादर्श' ला नावलौकिक प्राप्त करून दिला होता. प्रेक्षकांच्या गळ्यातले ताईत असलेल्या या दोघांना रंगभूमीवर एकत्र आणता आले तर प्रेक्षकांसाठी तो अपूर्व नयनोत्सव आणि श्रवणोत्सव ठरेल, असा विचार काही विशिष्ट परिस्थितीत पुढे आला आणि काही आडवळणे घेऊन झाल्यावर तो प्रत्यक्षात आला.

'सं. मानापमान' हे कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांचे पहिलेच संगीत नाटक. त्यापूर्वी खाडिलकर 'महाराष्ट्र नाटक मंडळी'त गाजले होते ते गद्य नाटककार म्हणून. सं. सौभद्र पाहिल्यावर खाडिलकरांनाही संगीत नाटक लिहावेसे वाटू लागले. ते सं. मानापमानपासून. 'किर्लोस्कर नाटक मंडळी'चे नाटककार, तालीममास्तर झाले. बालगंधर्वांसारखा गुणी गायक नट 'किर्लोस्कर' मध्ये होता. त्याला ते घडवीत होते. बालगंधर्वांना डोळ्यांपुढे ठेवूनच त्यांनी आपली संगीत नाटके लिहिली. खाडिलकरांच्या व्यक्तिमत्त्वाला अनेक पैलू होते. मुळात ते लो. टिळकांच्या तालमीत तयार झालेले राष्ट्रीय बाण्याचे वृत्तपत्रकार. स्वाभिमान, त्याग, राष्ट्रप्रेम, कृतिशील क्रांतिकारत्व त्यांच्या व्यक्तिमत्त्वातच होते. १९१० पर्यंत ते 'केसरी' चे उपसंपादक होते. अध्यात्माकडे ओढा होता, वेद-उपनिषदांचा अभ्यास होता, ऐतिहासिक दृष्टी होती. आपल्या गद्य नाटकांतून राजकारण आणि नाट्यकला यांची त्यांनी चांगली सांगड घातली होती. स्वातंत्र्यप्रीती, पराक्रमाची, पुरुषार्थाची आस हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वातले गुण, नाट्यतंत्रावर त्यांची जबरदस्त हुकमत असल्यामुळे, त्यांच्या गद्य नाटकांमध्ये प्रभावीपणे उतरले होते. असे हे गद्य नाटककार खाडिलकर 'केसरी' चे उपसंपादकत्व सोडल्यावर आणि त्यांचे दैवत लो. टिळक तुरुंगात असल्यामुळे अस्वस्थ होते. आता प्रवचनकाराचा पेशा पतकरावा का, या विचारात होते. परंतु नाटकाकडे ओढा असल्यामुळे, बालगंधर्वांसारखा मोहरा डोळ्यांसमोर असल्याने त्यांनी संगीत नाटक लिहिण्याचे ठरविले आणि त्यांच्या 'संगीत मानापमान' या पहिल्याच नाटकाने रंगभूमीवर दुसरी क्रांती घडवली. पहिली क्रांती झाली किर्लोस्करांच्या 'सं. शाकुंतल' मुळे.

'मानापमान' गाजले ते त्यातल्या संगीतामुळे. वास्तविक वाङ्मयीन दृष्ट्या ते अतिशय सुमार नाटक. (अन्य काही संगीत नाटकेही याला अपवाद नाहीत.) त्यातील खेळकर वातावरण, पराक्रमी वृत्तीचा, पुरुषार्थाचा संदेश यामुळे ते नाटक प्रेक्षकांना आवडले. मुख्य म्हणजे नारायण दत्तात्रय ऊर्फ नानासाहेब जोगळेकर, बालगंधर्व, गणपतराव बोडस या नटांमुळे हे नाटक प्रेक्षकांनी डोक्यावर घेतले. किर्लोस्कर ना. मं. ने 'सं. मानापमान' चा पहिला प्रयोग १२ मार्च १९११ ला मुंबईत रिपन थिएटरमध्ये केला. या पहिल्या प्रयोगाच्या दिवशीच बालगंधर्वांची कन्या निवर्तली. तरीही त्यांनी प्रयोग रद्द होऊ दिला नाही. त्यांच्या या रंगभूमीवरील निष्ठेमुळे त्यांच्या प्रतिष्ठेत आणि लोकप्रियतेत भर पडली. दुर्दैवाने या नाटकाच्या पहिल्या प्रयोगानंतर नऊ महिन्यांतच नानासाहेब जोगळेकर यांचे निधन झाले. आणि 'सं. मानापमान' चा हा पहिला धैर्यधर रसिक प्रेक्षकांना चटका लावून गेला. या नाटकापासून खाडिलकर 'किर्लोस्कर नाटक मंडळी'चे झाले.

संयुक्त प्रयोगासाठी 'सं. मानापमान' च का निवडले असेल, याची ही पार्श्वभूमी महत्त्वाची आहे. लो. टिळकांचा 'किर्लोस्कर ना. मंडळी'ला आशीर्वाद होता, नानासाहेब जोगळेकर लोकमान्यांच्या सांगण्यावरूनच 'किर्लोस्कर'-मध्ये गेले होते, 'बालगंधर्व' ही पदवी नारायणराव राजहंस यांना लोकमान्यांनी दिली होती. खाडिलकर हे लोकमान्यांच्या निधनानंतर म. गांधींकडे वळले असले, तरी मुळात ते लोकमान्यांचे अनुयायी होते आणि 'सं. मानापमान' चा संयुक्त प्रयोग करायचा होता, तो, म. गांधींनी टिळक स्वराज्य फंडासाठी एक कोटीचा निधी जमविण्याचा संकल्प केला होता, त्यासाठी! या संयुक्त प्रयोगाशी राजकारण आणि अर्थकारणही निगडित होते.








अनेक मोठ्या नाटक मंडळ्या राष्ट्रासाठी किंवा समाजकारणासाठी आपल्या उत्पन्नातील काही रक्कम कर्तव्यबुद्धीने देत असत. त्यात नवीन काही नव्हते. पण अशी शक्यता वाटते की, नुकतेच लोकमान्यांचे निधन झाले असल्यामुळे लोकांच्या मनात त्यांच्याविषयी जो आदर, प्रेम, अभिमान या भावना होत्या, त्या उत्कटतेची लाट म. गांधींना झेलायची होती. अन्यथा लो. टिळक आणि म. गांधी यांचे मार्ग भिन्न होते. टिळक क्रांतिकारक विचारांचे तर म. गांधी अहिंसावादी, शांततेचे पुरस्कर्ते. 'संयुक्त मानापमान' प्रयोगाला सोळा हजार उत्पन्न झाले, ती थैली म. गांधींनी प्रत्यक्ष रंगमंचावर येऊन स्वीकारावी, अशी सर्वांची इच्छा होती; पण दोन मिनिटेसुद्धा ते आले नाहीत. म. गांधींना नाट्यप्रेम अजिबात नव्हते; पण स्वराज्याच्या कामासाठी का होईना, कलावंतांच्या कलेचा, श्रमाचा पैसा चालणार होता. कला, कलावंत, राजकारणी यांचे परस्परसंबंध, कलेच्या व्यासपीठावर राजकारण्यांचे स्थान यांवर आज चर्चा चालू असते. त्याही काळात वेगळ्या संदर्भात कलावंतांचा अवमानच झाला.

'संगीत मानापमान' च्या किर्लोस्कर ना. मं. ने केलेल्या पहिल्या प्रयोगापासून ते संयुक्त प्रयोगाच्या वेळेपर्यंतच्या मधल्या काळातील महत्त्वाच्या घडामोडीही पहायला हव्यात. १० जुलै १९१३ ला 'किर्लोस्कर नाटक मंडळी'तून बालगंधर्व, गणपतराव बोडस आणि गोविंदराव टेंबे बाहेर पडले आणि त्यांनी 'गंधर्व नाटक मंडळी'ची स्थापना केली. १९२१ मध्ये खाडिलकरांच्या 'द्रौपदी' नाटकावर बालगंधर्वांनी केलेल्या भरमसाठ खर्चामुळे आणि ते नाटक साफ कोसळल्यामुळे बालगंधर्व कर्जात आकंठ बुडाले.

'ललितकलादर्श' च्या केशवराव भोसले यांचे 'राक्षसी महत्त्वाकांक्षा' चांगलेच गाजले होते. त्याच्या जोडीने ते 'सौभद्र', 'मानापमान' चे प्रयोग, मुंबईत बालगंधर्वांची नाटके चालू असतानाही, करू लागले होते. सुरुवातीला किर्लोस्कर ना. मं. च्या शंकरराव मुजुमदार यांच्याकडे 'मानापमान' ची मोनॉपली होती. खाडिलकरांनी ती काढून घेतल्यावर 'मानापमान' गंधर्व ना. मं. ला मिळाले. पुढे ते 'ललितकलादर्श' लाही मिळाले. 'ललितकलादर्श' च्या 'मानापमान' चा प्रथमप्रयोग डिसेंबर १९१५ मध्ये मुंबईत झाला. या वेळेपर्यंत केशवराव भोसले यांनी स्त्रीभूमिका करायचे सोडून दिले होते आणि ते पुरुषभूमिका करू लागले होते.

नाट्यक्षेत्रातील या सगळ्या घडामोडी या क्षेत्राविषयी आस्था असलेल्या जाणकारांच्या डोळ्यांपुढे होत्या. 'ललितकलादर्श' आणि 'गंधर्व नाटक मंडळी' या दोन कंपन्यांमधली तेढ, स्पर्धा सगळ्यांना दिसत होती. व्यक्तिशः केशवराव भोसले आणि बालगंधर्व यांच्यात दुरावा नसला तरी मनात स्पर्धेची भावना, थोडा मत्सर होताच. कोल्हापूरला महाराजांनी अचानक केशवरावांना नाटकाचा प्रयोग करायला सांगितला त्या वेळी त्यांच्याकडे आवश्यक ते सामान नव्हते. त्या वेळी गंधर्व ना. मं. चा मुक्कामही कोल्हापूरमध्ये होता. त्यांच्याकडे सामान होते, परंतु ते केशवरावांना त्यांनी दिले नाही. तेव्हाच दोन नाटक मंडळींतील दुराव्याची ठिणगी पडली होती. महाराजांनी मग गंधर्व नाटक मंडळीला प्रयोग करायला का बोलावले नाही, असाही प्रश्न मनात येतो.

या सगळ्या पार्श्वभूमीवर १९२० मध्ये शिलोत्री बँकेचे प्रमुख श्री. प्रभाकर शिलोत्री यांनी गंधर्व व ललितकलादर्श या दोघांनी एकत्र येऊन संगीत मानापमानचा संयुक्त प्रयोग करावा, अशी कल्पना मांडली. दोन यशस्वी नाटकमंडळ्या, दोन एका उंचीवर पोचलेले लोकप्रिय गुणी गायक नट, तीन नाटक मंडळ्यांच्या रंगभूमीवर भरभरून प्रेक्षक-प्रतिसाद मिळालेले 'संगीत मानापमान' सारखे नाटक, आणि खाडिलकरांसारखा ऋषितुल्य देशभक्त नाटककार, नाट्यशिक्षक असा योग आणण्याचा हा प्रयत्न होता.

केशवरावांनी या कल्पनेचे लगेचच स्वागत केले, मान्यता दिली; बालगंधर्वांनी प्रथम संमती दिली, परंतु त्यांच्या गुरूंनी, भास्करबुवा बखले यांनी, 'हजारो लोकांसमोर नारायणा, तू केशवरावांचे जोडे उचलणार?' असे उद्गार काढून विरोध दर्शविल्यावर बालगंधर्वांनी माघार घेतली, आणि हा संयुक्त प्रयोग त्या वेळी होऊ शकला नाही. नाटक पहायला येणाऱ्या तत्कालीन मध्यमवर्गीय आणि श्रीमंत समाजाची मनोभूमिका लक्षात घेऊन बालगंधर्वांच्या गुरूंनी विरोध केला असेल. ही

हकीगत श्री. भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर यांनी 'माझा नाटकी संसार' मध्ये लिहिलेली आहे. परंतु 'स्मृतिधन' मध्ये श्री. शंकर नीळकंठ उर्फ नानासाहेब चापेकरांनी याचा उल्लेखही केलेला नाही. मग सत्य काय, असा प्रश्न पडतो.

श्री. प्रभाकर शिलोत्री यांनी 'संयुक्त मानापमान'-ची कल्पना मांडली त्यापूर्वी चार-पाच वेळा तसा प्रयत्न केला गेला होता. पण बालगंधर्वांच्या हितचिंतकांच्या विरोधामुळे ते प्रयत्न फिसकटले. टिळक स्वराज्य फंडासाठी निधी जमविण्याचा विचार पुढे आला त्या वेळी डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर प्रभृतींनी ही कल्पना पुन: पुढे आणली, असे मामा वरेरकर लिहितात, तर श्री. चापेकर 'स्मृतिधन' मध्ये म्हणतात, की स्वत: बालगंधर्व एक दिवस केशवराव भोसले यांच्याकडे गेले आणि त्यांनी संयुक्त प्रयोगाचा प्रस्ताव मांडला. काहीही असो, 'संयुक्त मानापमान' चा प्रयोग ठरला.

८ जुलै १९२१ ला ग्रँटरोड, मुंबई येथील बालीवाला थिएटरमध्ये 'संयुक्त मानापमान' चा प्रयोग झाला. या प्रयोगात बालगंधर्व - भामिनी, केशवराव भोसले - धैर्यधर, गणपतराव बोडस - लक्ष्मीधर, वालावलकर -विलासधर, चापेकर - आक्कासाहेब असा नटवर्ग होता. पहिल्या रांगेचे तिकीट शंभर रु. व शेवटच्या रांगेचे पाच रु. होते. हा प्रयोग जाहीर झाल्यापासूनच प्रेक्षकांच्या उत्साहाला कसे उधाण आले होते, तिकिटे किती झटकन संपली, पुणे-मुंबईतीलच नव्हे तर कोल्हापूर, धारवाड, इंदूर, ग्वाल्हेर, नागपूर, कलकत्ता, हुबळी इ. ठिकठिकाणांहून प्रेक्षकांनी तिकिटे मिळवून ठेवली होती, केशवराव जिंकतील की बालगंधर्व, याबाबत पैजा लागल्या होत्या इ. रसभरित वर्णने वाचायला मिळतात. प्रयोगानंतर चाहत्यांनी आपापल्या दैवताच्या बाजूने कौल दिला. नाट्यक्षेत्रातले हे वातावरण, प्रेक्षकांची कलाभिरुची निकोप, निरोगी होती असे म्हणवत नाही. कलाक्षेत्रात जुगलबंदी असते, पण ती वैयक्तिक पातळीवर. अ-कलात्मक ईर्षेच्या भावनेने, व्यक्तिमाहात्म्याच्या दृष्टीने असणे ही गोष्ट कलेला हानिकारक होती.

'संयुक्त मानापमान' नंतर पंधरा दिवसांनी २२ जुलै १९२१ ला 'संयुक्त सौभद्र' चा प्रयोग झाला. त्यात बालगंधर्व - सुभद्रा, केशवराव - अर्जुन, मास्तर कृष्णा - नारद अशा भूमिका होत्या. ही दोन्ही संगीत नाटके. एक खाडिलकरी वळणाचे, एक किर्लोस्करी परंपरेतले. या प्रयोगांच्या केंद्रस्थानी असलेल्या कलावंतांना प्रेक्षकांच्या हृदयात स्थान होते ते त्यांच्या गायकीसाठी. प्रेक्षक नाटक पहायला येत नव्हते, श्रवणानंदासाठी येत होते. आपल्या आवडीच्या पदांच्या वेळी नाट्यगृहात बसायचे, इतर प्रवेशांच्या वेळी बाहेर फेरफटका मारायचा, असे प्रकार चालत. याला नाटकाचा अभिरुचिसंपन्न, जाणकार प्रेक्षक म्हणायचा का? अशा वागण्यामुळे कलावंतांच्या आत्मसन्मानाला ढळ पोचतो, याची जाणीव कोणालाच नसावी? प्रेक्षकांच्या अतिरेकी, एकांगी प्रेमामुळे केशवराव आणि बालगंधर्व या दोन कलावंतांची मन:स्थिती बिघडून गेली. या दोन प्रयोगांमध्ये फक्त पंधरा दिवसांचे अंतर; पण 'संयुक्त मानापमान' च्या वेळचे वातावरण 'संयुक्त सौभद्र' च्या वेळी राहिले नव्हते. केशवरावांना कृष्णाची भूमिका न देता अर्जुनाची दिली गेली. बालगंधर्वांच्या या निर्णयाने अनेकांच्या मनात शंकेची पाल चुकचुकली. 'संयुक्त मानापमान' नंतर बालगंधर्व मनाने ढासळले, उदास झाले आणि 'नारायणराव, कर्जाची चिंता कसली करता? तुम्ही आणि मी रंगभूमीवर एकत्र आलो की, हा हा म्हणता तुमचे कर्ज फेडून टाकू', असे मोठ्या मनाने, दिलदारपणे बालगंधर्वांना दिलासा देणारे केशवराव आत्महत्या करायला निघाले. काय असेल या घटनांचा अर्थ? हे संयुक्त प्रयोग व्हायला नको होते, असाच या दोन उदारमनस्क कलावंतांच्या आतल्या आवाजाचा कौल असावा. दोघेही एकमेकांची गुणवत्ता जाणून होते. कलावंतांच्या मनात स्पर्धा, ईर्षा, मत्सर अशा काही छटा असतात; पण माणूस म्हणून दोघेही सरलहृदयी, दिलदार, नम्र होते. म्हणूनच ही लढत दोघांनाही जखमी करून गेली.

या दोघांच्या गायनपरंपरांमधील भिन्नता, दोघांच्या आवाजाची, गायकीची भिन्न प्रकृती यांनीच या संयुक्त प्रयोगांची अखेर निश्चित केली होती. 'संयुक्त मानापमान'-ला खाडिलकरांनी विरोध केला. नाटक त्यांचेच. बालगंधर्वांवर त्यांचा फार जीव. टिळक स्वराज्य फंडासाठी प्रयोग. तरीही त्यांनी विरोध केला. प्रयोग बघायलाही ते

गेले नाहीत. बालगंधर्वांच्या गानगुरूंनी केलेला विरोध आणि खाडिलकरांनी केलेला विरोध यांतला सूक्ष्म फरकही जाणून घेतला पाहिजे. गानगुरूंचे उद्‌गार खरे असतील, तर ते आपल्या शिष्याचा तेजोभंग होऊ नये या भावनेने, प्रेमापोटी आलेले असावेत; कारण त्या काळी समाजात जातीयता होती, पण जातिद्वेष नव्हता. बालगंधर्वांना त्यांच्या गायकीची जाणीव देऊन गुरूंनी परावृत्त का केले नसेल, असा प्रश्न मनात येतो. खाडिलकरांना बालगंधर्वांच्या गायकीची, अभिनयाची सूक्ष्म जाण होती. केशवरावांच्या गायकीची आक्रमक, पल्लेदार जातकुळी आणि बालगंधर्वांचे मृदु-मधुर, लडिवाळ गायन यांच्या जुगलबंदीत, हजारोंच्या समुदायात कोणाचा प्रभाव पडेल याचा अंदाज त्यांच्यासारखा मुरब्बी तालीममास्तर नक्कीच घेऊ शकत होता. म्हणूनच त्यांनी विरोध केला. पण बालगंधर्वांभोवतीच्या अन्य हितचिंतकांपुढे खाडिलकर एकाकी पडले. 'मानापमान' चा संयुक्त प्रयोग हा मराठी संगीत रंगभूमीच्या लोकप्रियतेचा उत्कर्षबिंदू ठरला. टिळक स्वराज्य फंड हे व्यावहारिक निमित्त झाले.

वाङ्‌मयमूल्यांपेक्षा, अभिनयापेक्षा संगीत वरचढ ठरले, यात नाट्याची हानी झाली. केशवराव आणि बालगंधर्व यांच्या हार-जितीची चर्चा त्यांच्या गायनाच्याच अनुषंगाने झाली. दोघांचा वेगवेगळा घट्ट अभिमानी प्रेक्षकवर्ग होता. आमचा नारायण, तुमचा केशव अशी स्पर्धा प्रेक्षकांमध्ये होती. बालगंधर्वांचे अभिमानी केशवरावांची नाटके पहायला जात नसत. केशवरावांचे चहाते गंधर्वांच्या गाण्याला टाळ्या देत नसत, तर गंधर्वांचे चहाते केशवरावांच्या गाण्याला टाळ्या देत नसत. काहीजण तर त्या त्या पदाला उठून बाहेर जात, असे त्रिं. अ. धारणकर यांनी लिहून ठेवले आहे. (पिंपळगाव ते सुंदरवाडी.) नाटकाचा किंवा कोणत्याही कलेचा प्रेक्षक/श्रोता/वाचक हा पूर्वग्रहविरहित, शुद्ध कलास्वाद घेण्याच्या भूमिकेतून कलेकडे वळला पाहिजे. त्याची अभिरुची प्रगल्भ, संयमशील, चिंतनात्मक असली पाहिजे. त्याऐवजी हे उलटेच चित्र निर्माण झाले. यात नाट्यकलेची हानी झाली.

संयुक्त नाट्यप्रयोगांचा पुढील काळात असा अनिष्ट परिणाम झाला की, एकाच गायक किंवा गद्य लोकप्रिय नटाच्या जिवावर नाटक उभे करता येऊ शकते, असा विचार बळावत गेला. यातूनच 'नाइट सिस्टिम' ही घातक पद्धती रूढ झाली. काही वर्षांपूर्वी .... 'आणि काशिनाथ घाणेकर' अशा जाहिराती येत. त्याचा अर्थ काय होता? नाटक हा सांघिक खेळ आहे याचा विसर. व्यक्तिमाहात्म्य मोठे. त्या त्या नटांमध्ये गुणवत्ता निश्चितच होती; पण त्यांना किती डोक्यावर चढवायचे? लोकप्रियता, पैसा त्यांच्या डोक्यात जाऊन, ते व्यसनाधीन होऊन धुळीला मिळतील इतके? प्रेक्षक, मित्रपरिवार, हितचिंतक (?) यांच्या अतिरेकी प्रेमामुळे, कलाकारांच्या मर्यादाही त्यांना योग्य वेळी, योग्य पद्धतीने न दाखविल्यामुळे रंगभूमीने कित्येक मोहरे गमावले आहेत. 'किमयागार' सारखे चांगले नाटक बंद का पडले? कलावंतांचे, अभिनेत्यांचे महत्त्व आहेच. भक्ती बर्वे यांच्यानंतर अजून तरी त्या तोडीची 'फुलराणी' झाली नाही. प्रभाकर पणशीकरांनंतर 'तो मी नव्हेच' बंद पडले, हे सत्य आहे. पण तरीही कोणीच दुसऱ्या कलावंताची अवहेलना करून टोकाची भूमिका घेऊ नये. 'संयुक्त नाट्यप्रयोगा'त हे घडले. पुढे अनेक प्रकारचे संयुक्त प्रयोग रंगभूमीवर होऊ लागले. ज्याच्या नावावर नाटक चालते तो नट किंवा नटी कधीकधी शिरजोर होऊ लागली. नाट्यनिष्ठा, सहकलाकारां-विषयीचा आदर, रंगभूमीवर त्यांच्या अभिनयाला प्रतिसाद देणे या गोष्टी कमी कमी होऊ लागल्या. संगीत ही श्रेष्ठ कला आहे, पण नाट्याशी तिचे नाते कसे असावे याचे भान सुटल्यामुळे रंगभूमीवर मैफिली होऊ लागल्या. प्रेक्षकांच्या नाट्याभिरुचीला अनिष्ट वळण लागले. वैचारिकतेचा विकास झाला नाही. नाटकातून जीवनदर्शन घडविण्याचे सामर्थ्य उणावले. वाङ्‌मयीन गुणवत्तेचा लोप होऊन नाटकरूपी जलसे उभे राहिले. यातून आजतागायत प्रेक्षकवर्ग पूर्णपणे बाहेर पडलेला नाही.

संगीत नाटकांना विरोध मुळीच नाही. फक्त त्याला मर्यादा खूप आहेत. संगीताचा आनंद त्यातून मिळतो. नाट्याची प्रतीती येत नाही. मधुर संगीतावरच भाळलेला प्रेक्षकवर्ग नाटक या कलाप्रकाराची खरी ताकद किती मोठी आहे, या विचाराकडे वळतच नाही. ही गोष्ट या कलेची हानी करणारी आहे. नाट्यसंगीतातही पुढे खूप नवे बाज आले. घाशीराम कोतवाल, बेगम बर्वे, लेकुरे

उदंड जाहली इ. नाटकांतील संगीताने वेगळे वळण घेऊन नाट्य जिवंत करण्याचा यशस्वी प्रयोग केला. हे सारे स्वागतार्हच आहे; पण तरीही मानापमान, स्वयंवर, सौभद्र, संशयकल्लोळ, पंडितराज जगन्नाथ, कट्यार - - - इ. संगीतनाटकांचा चाहता वर्ग आणि वर उल्लेखिलेल्या नाटकांचा चाहता वर्ग यांत फरक आहे. अभिनयकलेची, नाट्याभिरुचीची जाण विकसित न होण्याचे मूळ संगीत रंगभूमी, संयुक्त नाट्यप्रयोग यांत आहे. म्हणून सं. मानापमान आणि सं. सौभद्र या दोन संयुक्त नाट्यप्रयोगांचा सर्वांगीण विचार महत्त्वाचा ठरतो.

* * *

अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण :

# 'नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य' - मौलिक संशोधन

पंडितराव पवार

**प्रास्ताविक :**

डॉ. धोंडीराम वाडकर हे लोकसाहित्यिकांच्या दुसऱ्या पिढीतील व्यासंगी अभ्यासक म्हणून ओळखले जातात. लोकसाहित्याचा मूलगामी क्षेत्रीय अभ्यास हे त्यांचे प्रमुख अभ्यासक्षेत्र आहे. त्यातून त्यांच्या गोल्ला, गवळी, गोपाळ या भटक्या जमातींचा क्षेत्रीय अभ्यास आणि संशोधन लोकसाहित्यात लक्षणीय भर टाकणारे ठरले आहे. याच अभ्यासातून त्यांचे अलीकडे १. नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य, २. गोसावी जमातीचा आणि लोकसाहित्याचा अभ्यास, ३. पशुपालक भटक्या जमातीचे जीवनमान : एक तौलनिक अभ्यास- हे लोकसाहित्य-विषयक तीन ग्रंथ सिद्ध झाले आहेत.

लोकसाहित्य ही लोकांनी लोकांत राहून केलेली साहित्यनिर्मिती आहे. मौखिक परंपरेतून काळाच्या ओघात तिला लिखित स्वरूप प्राप्त होते. असे असले तरी लोकप्रवाहातील हे साहित्य कितीतरी प्रमाणात लोककथा, लोकगीते, उखाणे, म्हणी, ओव्या, आरत्या, आहाणे इत्यादी रूपांत मौखिक स्वरूपात एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे संक्रमित होत असते. लोकसाहित्य ही त्यामुळे कुणा एकाची निर्मिती नाही. लोकसाहित्य स्थळकाळानुसार आपले स्वरूप आणि आविष्कार या दृष्टीने बदलत असते. त्यातून या साहित्याचे लोकतत्त्वीय स्वरूप आणि लोकबंध यांचे विविध घटकही जाणवतात. त्या दृष्टीने लोकसाहित्याचा अभ्यास आपल्या भारतीय संस्कृतीला पूरक ठरून ते संस्कृतिवृद्धीचे आणि संवर्धनाचेही काम करते. संशोधक आणि अभ्यासक यांना या स्वतंत्र अभ्यासक्षेत्राचे मोठे आव्हानही असते. हे आव्हान केवळ सैद्धान्तिक पातळीवर राहिले, तर लोकव्यवहारातील लोकतत्त्वांचा अभ्यास उजेडात आणणे शक्य होत नाही. डॉ. वाडकर यांनी आपल्या 'नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य' या ग्रंथात लोकसाहित्याच्या लिखित स्वरूपाबरोबरच मौखिक-क्षेत्रीय संशोधनही वास्तव स्वरूपात वाचकांपुढे सादर करून फार मोठे काम केले आहे.

'नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य' हा लोकसाहित्यविषयक ग्रंथ असला, तरी या ग्रंथाला धार्मिक संप्रदायाची पार्श्वभूमी आहे. धर्म-संप्रदाय आणि विविध पंथांचे वाङ्मय हेदेखील लोकसाहित्याचा भाग आहे. त्या दृष्टीने या ग्रंथात डॉ. वाडकर यांनी १. नाथ संप्रदायाचा उगम आणि विकास आणि सांस्कृतिक पार्श्वभूमीचा लोकतत्त्वीय अभ्यास, २. नाथ संप्रदायातील तीर्थक्षेत्रांचा लोकतत्त्वीय अभ्यास, ३. नाथ संप्रदाय व इतर संप्रदायांचा अभ्यास आणि ४. नाथ संप्रदायातील लोकसाहित्याचा व वाङ्मयाचा लोकतत्त्वीय अभ्यास या चार प्रमुख घटकांचा सांगोपांग आणि संदर्भ अभ्यास सादर केला आहे.

**नाथ संप्रदायाची सांस्कृतिक पार्श्वभूमी आणि लोकतत्त्वीय अभ्यास :**

वारकरी, महानुभाव, जैन, बौद्ध, वीरशैव, सूफी इत्यादी धर्मसंप्रदायांप्रमाणे नाथ संप्रदायाचे समाजातील स्थान अत्यंत महत्त्वाचे आहे. भारतीय संस्कृतीचे अधिष्ठान वरील धर्मसंप्रदायांवर उभारलेले आहे. या पंथात नाथ संप्रदाय एक प्रमुख संप्रदाय असून या संप्रदायाचा प्रसार सर्व देशभर झालेला असल्याचे लेखकाने त्यातील वाङ्मय आणि स्थळदर्शनातून सप्रमाण दाखवून दिले आहे. नाथ संप्रदाय समाजातील सर्वसामान्य लोकांपर्यंत पोचला आणि काळाच्या ओघात टिकून राहिला; कारण सामान्य लोकांची दुःखे, शारीरिक पीडा दूर करण्याचे काम या पंथाने मोठ्या प्रमाणात केले. म्हणून या पंथाबद्दल अद्यापही सामान्य लोकांना आकर्षण वाटते. महाराष्ट्रात प्रामुख्याने अहमदनगर आणि बीड जिल्ह्यांत या संप्रदायाची तीर्थस्थाने आहेत. काही नाथपंथीय विभूतींच्या संजीवन समाध्या आहेत. त्यामुळे या परिसरात होणाऱ्या जत्रा, उत्सव यांनाही मोठे महत्त्व प्राप्त झाले आहे.

नाथ संप्रदायाचे एकंदर सांस्कृतिक स्वरूप लेखकाने








विस्ताराने आपल्या ग्रंथात विशद केले आहे. नाथ संप्रदायाचा प्रारंभ आदिनाथ शंकरापासून झाला असून या पंथाला आदिनाथ संप्रदाय किंवा शैव संप्रदाय या नावानेही ओळखले जाते. नाथ म्हणजे रक्षण करणारा स्वामी असे म्हटले जाते. 'नाथ संप्रदाय ही मध्ययुगीन साधनेची गंगोत्री आहे', हे लोकसाहित्याचे ज्येष्ठ संशोधक डॉ. रा. चिं. ढेरे यांचे मतही लेखकाने आधारभूत मानले आहे.

महाराष्ट्रातील नाथपंथ सर्व धर्मांतील जातींमध्ये मिसळलेला आहे. नाथपंथ कृष्ण-विठ्ठल उपासनेत एकरूप झालेला असून नाथपंथाचा वैष्णव धर्माशी संबंध आहे. त्यामुळे 'हरिहराचे ऐक्य' ही नाथ संप्रदायाची प्रमुख धारणा आहे, असे लेखकाने स्पष्ट केले आहे. 'हा संप्रदाय स्त्रीशूद्रांचा त्राता आहे. तसेच हिंदू-मुस्लिम ऐक्याचा पुरस्कर्ता, लोकभाषेचा पुरस्कर्ता आहे', हे डॉ. ढेरे यांचे मत विचारात घेऊन लेखकाने या पंथाची पार्श्वभूमी अधिक विस्ताराने विशद केली आहे. ग्रंथातील सप्रमाण विवेचनावरून हे मत मान्य होण्यासारखे आहे. संत ज्ञानेश्वरांनी गुरू निवृत्तिनाथ यांच्याकडून नाथपंथाची दीक्षा घेतली होती. त्यामुळे त्यांच्या वाङ्मयातून ज्ञान, धर्म, कर्म आणि भक्ती या चारही मुक्तीच्या वाटा या संप्रदायात एकत्र येतात. या संप्रदायातील साधू, बैरागी, फकिरी वेशातील भिक्षेकरी 'अलख निरंजन' अशी हाक देऊन भिक्षा मागतात. येथे गुरूपरंपरेला महत्त्व असून सामान्य माणसांवर प्रेम करून समाजातील विषमता दूर करून या संप्रदायाने जनसामान्यांत जवळीक निर्माण केली आहे, असे आपले मत लेखकाने मांडले आहे.

**नाथ संप्रदायातील लोकतत्त्वे :**

प्राचीन लोकसाहित्य प्रामुख्याने संतांनी सर्वसामान्यांना परमार्थ मताकडे वळविण्यासाठी लिहिले, असे लेखकाचे मत आहे. या लोकसाहित्याचा एक पर्याय म्हणून 'लोकतत्त्व' हा शब्द लोकसाहित्यात वापरण्यास हरकत नसावी, असे डॉ. ढेरे यांचे मत लेखकाने विचारात घेऊन 'लोकतत्त्व म्हणजे समाजामध्ये रूढी, परंपरेनुसार काही तत्त्वे ठरलेली असतात; समाज निमूटपणे ती तत्त्वे मान्य करून जगतो; या तत्त्वांना लोकतत्त्व म्हणता येईल', अशी डॉ. वाडकर यांनी लोकतत्त्वाची व्याख्या केली आहे. लोकसाहित्याचे एक ज्येष्ठ अभ्यासक डॉ. शरद व्यवहारे यांनी लोकतत्त्वाबद्दल म्हटले आहे की, 'लोकमाणसाच्या अभिव्यक्तीतूनच लोकसंस्कृती, लोकधर्म, लोकसाहित्याची जडणघडण झाली आहे. आणि या जडणघडणीत लोकतत्त्वांचा सहभाग आहे. लोकसंस्कृतीच्या अविभाज्य घटकांना लोकतत्त्व म्हणता येईल. परंपरा, रूढी, लोकविश्वास, विधी, शुभ-अशुभाच्या कल्पना इत्यादींतून लोकतत्त्वाचा प्रत्यय येतो' (लोकसाहित्य : संकल्पना आणि स्वरूप - लोकसाहित्यदर्शन, संपादक - डॉ. रमेश देवरे, पृ. ५९). डॉ. व्यवहारे यांची लोकतत्त्वाची ही भूमिका अधिक स्पष्ट आणि डॉ. वाडकर यांच्या व्याख्येला पाठबळ देणारी आहे. डॉ. वाडकर यांनी आपल्या भूमिकेच्या आधारे नाथपंथातील लोकतत्त्वांचा सविस्तर आढावा घेतलेला आहे.

संतसाहित्यात प्रामुख्याने वारकरी, महानुभाव, दत्त, समर्थ आणि नाथ संप्रदायांचा समावेश होतो. नाथ संप्रदायाचा प्रभाव अखिल भारतीय समाजावर पडलेला दिसतो. म्हणून आधुनिक भारतीय भाषांशी या संप्रदायाचा संबंध जोडलेला आहे. इसवी सनाच्या दहाव्या-अकराव्या शतकांत भारताच्या सांस्कृतिक जीवनाला मुसलमानी राजवटीमुळे हादरा बसल्याने त्याचा परिणाम समाजावरही झालेला होता. त्या काळात तांत्रिक साधना सर्वत्र फोफावलेली होती. योगमार्गाला या काळात अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले होते. त्या वेळी नाथपंथाचे कार्य लक्षणीय होते. नाथपंथ, अवधूत पंथ, योगमत, सिद्धपंथ, गोरखपंथ इत्यादी नावे या पंथास पडलेली आहेत. नाथ या शब्दाचा अर्थ धनी, स्वामी, मालक, सृष्टीचा निर्माता, पालनकर्ता असा आहे. 'न+अथ म्हणजे ज्याला प्रारंभच नाही तो अनादी', असा हा पंथ असल्याचा अर्थ डॉ. वाडकरांनी सांगितला आहे.

नाथ संप्रदाय हा शैव संप्रदाय असून शिव, शिवभैरव, एकलिंग यांची उपासना या पंथात केली जाते. अंबा, जगदंबा, दुर्गा, त्रिपुरा आदी शक्तिदेवतांना येथे महत्त्व आहे. त्यामुळे भारतभर या पंथाच्या उपासनेची स्थळे असून त्या निमित्ताने तेथे विधी, जत्रा, यात्रा यांतून निर्माण झालेले लोकसाहित्य लोककथा, लोकगीत, आरत्या, स्थलवर्णन, ओव्या इत्यादी रूपांत साकारले

असून त्यातून लोकतत्त्वांचा प्रत्यय येतो. 'अवधूत गीता', 'नवनाथ कथासार' या प्रकाशित ग्रंथांप्रमाणेच 'अमरनाथ संवाद' आणि 'गोरक्षगीता', 'गहिनीप्रताप' इत्यादी अप्रकाशित ग्रंथ या संप्रदायाच्या लोकवाङ्मय व लोकतत्त्वीय अभ्यासासाठी उपयुक्त आहे, असे लेखकाचे निरीक्षण आहे.

निवृत्तिनाथ हे शिवाचे आणि ज्ञानदेव हे विष्णूचे अवतार मानले गेले असून या पंथात शिव आणि विष्णूच्या ऐक्याचे दर्शन घडते, असे डॉ. वाडकर यांनी स्पष्ट केले आहे. श्री मत्स्येंद्रनाथ हे नाथपंथाचे पहिले मानवी प्रवर्तक आणि गुरू मानले जातात, तर श्री ज्ञानेश्वरांनी कृष्णभक्तीचे बीज नाथपंथात लावले. त्यामुळे या पंथातील साहित्याला एक लोकतत्त्वीय प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. याप्रमाणे ज्ञानेश्वरांच्या काळात महाराष्ट्रात नाथसिद्धांचा प्रसार होत होता. या योग्यांचा संचार नाशिक, त्र्यंबकेश्वर, पैठण, आळंदी, नेवासे इत्यादी ठिकाणी होता. त्यामुळे या परिसरातूनही लोकतत्त्वांचा अनुभव येतो. त्याचप्रमाणे या संप्रदायातील योग्यांनी स्वीकारलेली वेदातील योग-परंपरा, कुंडलिनीशक्ती आदींचे उपयोजनदेखील लोकतत्त्वीय अंगाचे प्रदर्शन करणारे आहे, असे लेखकाने स्पष्ट केले आहे.

महाराष्ट्रात नाथपंथीयांच्या समाध्या, गुहा, मठ, आखाडे, आश्रम, डोंगर, मंदिरे आढळतात. या स्थळदर्शनातून आणि उत्सवातून निर्माण झालेल्या लोककथा, योग अभ्यासकेंद्रे, मेळे यांतून अनेक लोकतत्त्वीय घटक दिसून येतात. त्याचप्रमाणे पंथीय निष्ठा, नाथपंथीय वाङ्मय, शिवभक्ती, स्त्रीभक्ती, कृष्णभक्ती, प्राण-मनसाधना, कुंडलिनीजागृती इत्यादींमधूनही लोकतत्त्वांचे दर्शन घडते. ही लोकतत्त्वे लोकसाहित्याला पूरक आहेत, हे लेखकाने सोदाहरण स्पष्ट केले आहे.

**नाथसंप्रदायातील तीर्थक्षेत्रे आणि लोकतत्त्वीय अभ्यास :**

महाराष्ट्रात असणाऱ्या नाथसंप्रदायाशी निगडित तीर्थक्षेत्रांचा लोकतत्त्वीय अभ्यास हा पंथाचे जनमानसातील स्थान समजण्यास उपयुक्त ठरतो. त्या दृष्टीने डॉ. वाडकर यांनी नेवासा, मढी, वृद्धेश्वर, गहिनीगड, पुणतांबे, हरिश्चंद्रगड, पंढरपूर, श्रीक्षेत्र मच्छिंद्रनाथ (मायंबा) गड आदी नाथपंथीय तीर्थक्षेत्रांचा लोकतत्त्वीय दृष्टीने परिचय करून दिला आहे.

श्री ज्ञानेश्वर यांनी ज्ञानेश्वरी हा ग्रंथ नेवासे येथे लिहिला. त्यामुळे या तीर्थक्षेत्राला नाथपंथात विशेष महत्त्व आहे. त्यामुळे या परिसरात लोकसाहित्य निर्माण झाल्याचे दाखले लेखकाने दिले आहेत. तसेच ज्या 'पैस'च्या खांबाला टेकून श्री ज्ञानेश्वरांनी ग्रंथ लिहिला, त्यामुळे हे स्थान वारकरी संप्रदायाचे पवित्र श्रद्धास्थान आहे. याप्रमाणे नाथ संप्रदाय आणि वारकरी संप्रदाय यांचा दृढ संबंध येथे ध्यानी येतो. त्यामुळे सबंध देशातून भाविक येथे येतात. येथे मोठा उत्सव होत असतो आणि लोकतत्त्वीय दृष्ट्या हे स्थळ अतिशय महत्त्वाचे आहे. लेखकाने या स्थळाबरोबरच येथील साहित्यनिर्मितीचा लोकतत्त्वीय दृष्ट्या सोदाहरण परिचय करून दिला आहे.

नगर जिल्ह्यातील 'मढी' हे नाथ संप्रदायाचे सर्वांत पवित्र असे तीर्थक्षेत्र आहे. येथे कानिफनाथाची संजीवन समाधी आहे. येथील मंदिरांसंबंधीचा इतिहास, या स्थळावरील गर्भगिरीचा महिमा, येथील जातपंचायतीचे महत्त्व इत्यादी तपशील लेखकाने विशद केला आहे. येथे सर्व जातिधर्मांचे लोक येतात. त्यामुळे नाथसिद्धांनी सर्व जातिधर्मांतील भटक्या विमुक्तांना जवळ केल्याचे लेखकाचे विवेचन आहे. या ठिकाणी विविध उत्सव, यात्राप्रसंगी एकत्र आलेल्या भाविकांनी लोकसाहित्य-निर्मितीत भर घातली आहे. येथील विधी आणि अन्य उपासनापद्धतींतूनही लोकतत्त्वांचा उघडपणे प्रत्यय कसा येतो, हेही लेखकाने तपशीलवार मांडले आहे. एकंदरीत मढी या धार्मिक तीर्थक्षेत्राचा सामाजिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या समाजाला खूपच उपयोग झाला आहे. या देवस्थानास अठरापगड जातीचे लोक श्रद्धास्थान मानतात. येथील कानिफनाथ (कान्होबा) वर लोकांची स्थिर श्रद्धा आहे. या गडावरील विविध यात्रा-उत्सव यामुळे लोकांचा आर्थिक स्तर उंचावला आहे. तसेच काही लोक नवस बोलतात, काही योगमार्ग अवलंबतात तर काही लोक जातपंचायतीतून आपले प्रश्न सोडवितात. हे सर्व लोकतत्त्वीय घटक लोकसंस्कृतीला समृद्ध करतात, असे लेखकाने विशद केले आहे.








वरील स्थळाप्रमाणे वृद्धेश्वर (म्हातारदेव) म्हणजे वृद्ध असे स्वयंभू शिवलिंग, त्याचे स्थळमाहात्म्य आणि लोकसंस्कृतीवरील परिणाम स्पष्ट केला आहे. पुणतांबे येथील श्री चांगदेव समाधी, हरिश्चंद्रगड येथे श्री चांगदेवांनी केलेली 'तत्त्वसार' ग्रंथाची निर्मिती, पंढरपूर येथील श्री विठ्ठलाची मूर्ती म्हणजे हरिहरेश्वराचे प्रतीक, ही स्थळे नाथपंथीय लोकतत्त्वांचा प्रसार करणारी आहेत.

श्री क्षेत्र मच्छिंद्रनाथगड हे गर्भगिरी पर्वताच्या माथ्यावर असलेले मच्छिंद्रनाथांचे समाधी स्थळ होय. या ठिकाणाला 'मायंबा' म्हणजे सर्वांचे मायबाप असे संबोधले जाते. अंबेजोगाई, परळी वैजनाथ आदी स्थळांचा पंथीय दृष्ट्या परिचय करून देण्यात आला आहे. या स्थळासंबंधीच्या अनेक कथा-आख्यायिका प्रचलित असून त्यांचा संबंध लोकतत्त्वांशी जोडलेला आहे. नाथ संप्रदायाची अशी अनेक तीर्थक्षेत्रे लोकाभिमुख असून येथील यात्रा--उरुस निमित्ताने विविध जातिधर्मांची माणसे एकत्र येतात. त्यांत बंधुभाव निर्माण होऊन ती विचार व भाषेची देवाण-घेवाण करतात. त्यातून लोकोद्धार आणि आत्मोद्धार होतो. हरिहराचे ऐक्य या विविध तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी प्रत्ययास येते. समाजातील एकसंधता दिसते. समाजातील हुंडाबळी, व्यसनाधीनता कमी करण्याचे काम ही तीर्थक्षेत्रे करतात. स्पृश्य-अस्पृश्य, स्त्री-पुरुष, गरीब-श्रीमंत असे भेदभाव येथे लयास जातात. जनमानसामध्ये सत्य, अहिंसा, सदाचार इत्यादी मूल्ये रुजण्यास मदत होऊन लोकसंस्कृतीच्या बांधणीस आणि संवर्धनास खूपच उपयोग होतो. या दृष्टीने महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनामध्ये नाथ संप्रदायातील लेखन, आचार-विचार यांचा आणि तीर्थक्षेत्रांचा वाटा खूपच मोठा आहे. हीच लोकतत्त्वे लोकसाहित्याबरोबर समाजाच्याही विकासास हातभार लावतात, अशी डॉ. वाडकर यांची एकंदर भूमिका येथे विविध अंगांनी प्रकट झाली आहे. विविध तीर्थक्षेत्रे आणि तेथील परिसरांवर त्यांचा होणारा सांस्कृतिक प्रभाव हादेखील लोकतत्त्वे रुजविण्याचे काम करतो, असेच यातून सूचित होते.

**नाथ संप्रदायातील लोकसाहित्य आणि लोकतत्त्वदर्शन**

नाथ संप्रदायातील मौखिक वाङ्मय आणि लिखित साहित्य यांतील लोकतत्त्वांचा विस्तृत परिचय या ग्रंथात सोदाहरण वाचावयास मिळतो. या साहित्यातील लोकगीतांतून धर्माचरण, देवदेवता वा त्यांच्या उपासना, ओव्या, सिद्धयोग्यांच्या तीर्थस्थानातून दिसणाऱ्या चमत्कारजन्य घटना, पुराणातील पातिव्रत्य आणि सतीत्वाचे संदर्भ या साहित्यात विपुल प्रमाणात दिसतात आणि त्यामुळे लोकसाहित्य सांस्कृतिक दृष्ट्या संपन्न होताना जाणवते.

लोकमानसात श्रद्धा असलेल्या श्री क्षेत्र मच्छिंद्रगड स्थानाविषयी, श्री मच्छिंद्रनाथासंबंधी स्त्रियांच्या ओव्या, लोककथा-गीते, आरत्या, पाळणे इत्यादींमधून नाथपंथावरील दृढ श्रद्धाच व्यक्त झालेली आहे. मच्छिंद्रनाथ आणि गोरक्षनाथ गर्भगिरी पर्वतावर येत असताना मच्छिंद्रनाथाच्या झोळीतील सोन्याची वीट काढून त्या ठिकाणी त्या वजनाचा दगड ठेवणे, त्यामुळे मच्छिंद्रनाथ सैरभैर झाल्यावर गोरक्षनाथाने सिद्धयोग प्रयोगाने तेथे माती टाकल्यावर तो पर्वत सोन्याचा होणे या आख्यायिकेमुळे लोकमनाची श्रद्धा दृढ होते. ही गुरू-शिष्य परंपरेची श्रद्धा म्हणजे एक श्रेष्ठ लोकतत्त्वाचा प्रत्यय आणून देणारी घटना लेखकाने विस्तृतपणे सांगितली आहे. त्याचप्रमाणे या पंथातील कित्येक स्त्रीगीतांनी रसिक मनाला भुरळ घालण्याचे काम केले आहे. कारण ही गीते खूपच भावनिक आहेत.

या पंथातील लोकतत्त्वांचा परिचय 'नवनाथ भक्तिसार' या ग्रंथातील नवनाथांच्या जन्मकहाण्या, त्यांचे लोकमानसातील कार्य, त्या ग्रंथाचे समाजातील पवित्र स्थान या दृष्टीने विस्ताराने वाचावयास मिळते. त्याचप्रमाणे नाथ संप्रदायातील आचारधर्म, लोकरूढी, भ्रमंती, श्रद्धा आणि एकंदर लोकमानसातून लोकतत्त्वाचा आढळ कसा होतो, हे येथे लेखकाने तपशीलवार मांडले आहे. विचारातील विवेक, वाणीतील सत्यता आणि आचारातील शुद्धता हे नाथपंथाच्या शिकवणुकीचे सार लोकांना कल्याणप्रद कसे वाटते, यावर लेखकाने भर दिलेला आहे. भगवे वस्त्र, रुद्राक्ष माळ, दोन शैली जानवे, त्याला अडकवलेली शृंगी हा नाथपंथीय साधूंचा अवतार एकंदर वैराग्याचे प्रतीक. भिक्षाव्रतातून त्यांचा निरपेक्ष जीवनदृष्टिकोण व्यक्त होतो. या निरपेक्ष वृत्तीतून सर्वसामान्य माणसास या पंथाबद्दल आसक्ती निर्माण

होते.

आपले दुःख, व्याधी या बैराग्यांना सांगून दुःख कमी करण्याची श्रद्धा लोकांत रूढ होती. काही लोक देवदेवतांची तांत्रिक पूजा, कर्मकांड करीत. तेही या सिद्धयोग्यांनी कमी केल्याचे संदर्भ म्हणजेही लोकतत्त्वे होती. पशुपक्ष्यांचे बळी देण्याची यज्ञपद्धती, उच्च वर्गाने मुंज करण्याची रूढी, सतीची चाल इत्यादी लोकरूढी या पंथीयांनी बंद केल्या. पंथातील सिद्धपुरुष, शिष्य हे भ्रमंतीमधून आपले लोकोद्धाराचे कार्य करतात. त्या भ्रमंतीत गेलेला डोळा पुन्हा मिळवून देण्याचा चमत्कार कसा घडतो, अशा अनेक लोकरूढी या वाङ्मयातून दिसतात. इतरही अनेक चमत्कारकथा येथे वाचावयास मिळतात.

नाथ संप्रदायातील गुरू-शिष्य परंपरा, दीक्षा विधी, फलश्रुती इत्यादींचे तपशील लेखक विस्ताराने देतो. उदा., एका स्त्रीला मूल होत नाही म्हणून श्री गोरक्षनाथांनी भस्म देऊन मंत्रघोष करताच तिला मूल होणे हा चमत्कार म्हणजे एक फलश्रुतीच होय. मात्र विज्ञानयुगात या घटनेला आव्हान दिले जाऊ शकते.

**नाथपंथातील धार्मिक लोकतत्त्वे :**

लोकसाहित्यातील धार्मिक अंगाला लोकसंस्कृतीत महत्त्वाचे स्थान असते. त्या दृष्टीने नाथपंथीयांच्या वाङ्मयातून आणि आचरणातून अनेक धार्मिक लोकतत्त्वे प्रकट झालेली आहेत. त्यांचा परिचय लेखकाने येथे विस्ताराने करून दिला आहे. हा पंथ गुरुमुखी असून गुरुनिष्ठा आणि सेवाभावी वृत्तीला येथे महत्त्व आहे. या पंथातील योगी सतत भटकंती करीत राहिले. त्यांनी समाजाचे डोळस दर्शन घेऊन धर्मजागृती केली. त्यासाठी आपल्या आचरणातून ज्ञान, भक्ती आणि वैराग्याचा मार्ग चोखाळला. समाजातील कर्मकांडाला विरोध केला. योग-हटयोग यांतून खऱ्या ज्ञानाचा प्रत्यय आणून देण्याचे कार्य केले. समाजात हरिहरऐक्याला महत्त्व देऊन अद्वैत तत्त्वज्ञान समाजासमोर आपल्या कृतीतून दिले आणि हे लोकतत्त्व त्यांनी स्वतःच्या आचरणातून समाजात रुजविले. एकंदरीतच गुरुभक्ती, तपश्चर्या, हटयोग साधना, जीवब्रह्म सेवा, हरिहरऐक्य, भक्तितत्त्व, शाबरी विद्या इत्यादी धार्मिक लोकतत्त्वे 'नवनाथ भक्तिसार' या प्रमुख ग्रंथात असल्याचे लेखकाने स्पष्ट केले आहे. नवनाथांच्या जन्मकथांचे रहस्य, त्यांचे अयोनी जन्म, त्यांचे कर्तृत्त्व आदींचाही परिचय लेखकाने विस्ताराने करून दिला आहे. त्यामुळे या पंथाबद्दलची लोकमानसातील श्रद्धा वाढीस लागल्याचे लेखकाने स्पष्ट केले आहे. एकंदरीत नाथपंथ हा शैवसंप्रदाय असून तो निर्गुणोपासक पंथ आहे. महानुभाव पंथ, दत्त संप्रदाय, समर्थ संप्रदाय, वीरशैव संप्रदाय इत्यादी संप्रदायांशी या पंथाचे निकटचे संबंध आहेत. त्याचप्रमाणे नाथ संप्रदाय हा वारकरी संप्रदायाच्या प्रेरणास्थानी असल्याने महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीत या पंथाचे योगदान महत्त्वाचे आहे. तसेच या पंथाने लोकभाषांचा स्वीकार केल्यामुळे सामाजिक-धार्मिक लोकतत्त्वे विशद होण्यास खूपच मदत झाली, असा लेखकाचा दावा आहे. कारण भाषाभाषांतील भावना-विचार यांचे आदानप्रदान हे सांस्कृतिक जडणघडणीस निश्चितपणे उपयुक्त ठरते. त्यातून सांस्कृतिक ऐक्य साधले जाते.

**समारोप :**

या ग्रंथात लेखकाने नाथसंप्रदायासंबंधी ऐतिहासिक, धार्मिक आणि सांस्कृतिक माहिती अतिशय तपशीलवार जमा करून अनेक संदर्भांसह विनम्रपणे सादर केली आहे. यात नाथ संप्रदायाचा उदय आणि सांस्कृतिक पार्श्वभूमीसह लोकतत्त्वीय अभ्यास अतिशय मूलगामी स्वरूपाचा आहे. त्याचप्रमाणे या संप्रदायातील तीर्थक्षेत्रांना भेटी देऊन, जाणकारांच्या मुलाखती घेऊन तेथील पंथीय महत्त्व आणि लोकसाहित्यातील लोकतत्त्वाची व्याख्या करून त्याचा लोकसाहित्याच्या भरणपोषणास कसा उपयोग होतो, हे सोदाहरण पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. लोकसाहित्यातील संशोधन कधीच अंतिम नसते, याचेही भान डॉ. वाडकर यांना आहे.

नाथ संप्रदायाबरोबरच महानुभाव, वारकरी, दत्त, समर्थ, सूफी, वीरशैव या पंथांचे स्वरूप, त्यांतील तत्त्वज्ञान आणि नाथ पंथाशी असणारे नातेही विस्ताराने सांगितले. त्यामुळे अभ्यासकांची चांगली सोय झाली आहे.

नाथ संप्रदायातील लोकसाहित्यातून जाणवणारी लोकतत्त्वे लेखकाने क्षेत्रीय संशोधनाच्या आधारे विशद करून आपल्या ग्रंथाचे मोल वाढविले आहे. त्यामुळे

लोकसाहित्याचे आदिम स्वरूप आणि धर्मप्रथांतील लोकतत्त्वे यांचे दृढ संबंध आकळण्यास मदत होते. किंबहुना ही लोकतत्त्वे म्हणजे लोकसाहित्याचा गाभाच असतात असे म्हटले तर वावगे ठरणार नाही, इतके मूलगामी विवेचन या ग्रंथातून वाचावयास मिळते.

या ग्रंथातील विवेचनात विशिष्ट विचारांच्या संदर्भात विवेचन करताना लेखकाने बऱ्याच ठिकाणी पुनरावृत्ती केलेली आढळते. काही संदर्भ, विधाने पुन्हा पुन्हा वाचावी लागतात.

नाथपंथाचे धार्मिक, तात्त्विक विवेचन लोकमानसाच्या उद्धारासाठी पूरक जरूर आहे. मात्र गर्भगिरीवर गोरक्षनाथाने लघुशंका करून किंवा माती उधळून तो पर्वत सोन्याचा करणे, राखेची पुडी देऊन एखाद्या स्त्रीला पुत्रप्राप्ती करून देणे, पितृश्राद्धाच्या ठिकाणी एखाद्या स्त्रीला डोळा काढून देणे आणि पुन्हा संजीवनी मंत्राने पूर्ववत करणे, फळांची इच्छा व्यक्त होताच कानिफनाथाने झाडावर भस्म फेकताच भरपूर फळे समोर पडणे, बत्तीस शिराळे येथील गावात सर्पांनी स्त्रियांच्या मनोकामनापूर्तीसाठी त्यांच्या घरी जाणे अशा प्रकारच्या नवनाथांच्या चमत्कारपूर्ण घटना श्रद्धादर्शक असल्या, तरी आजच्या प्रगत विज्ञानयुगात विश्वासार्ह वाटत नाहीत. तथापि हा पंथ योग आणि चमत्कार यांना महत्त्व देणारा असल्याने भाविकांना त्या घटना मनोमन नाकारता येत नाहीत. शिवाय या पंथाच्या विचारांचा प्रभाव श्रद्धाळूंच्या मनावर घट्टपणे पडला आहे.

अखेरीस समाजातील रूढी, परंपरा, चमत्कार यांमुळे समाजधारणेसाठी काही तत्त्वे रूढ होतात आणि त्या तत्त्वांचा स्वीकार करून लोकमानस आपले व्यवहार करत असते. त्यातूनच लोकतत्त्वे लोकसाहित्याचा एक अंगभूत घटक ठरतात, ही लेखकाची धारणा या ग्रंथात अतिशय अभ्यासपूर्ण पद्धतीने दिसून आली आहे. या मौलिक संशोधन ग्रंथाने लोकसाहित्याच्या लोकतत्त्वीय अभ्यासात चांगली भर पडली आहे. ग्रंथातील संदर्भसूचीवरून लेखकाचे परिश्रम आणि व्यासंगही प्रत्ययास आल्याशिवाय राहत नाही. नाथपंथीय सिद्धयोग आणि त्याचे पूजा साहित्यदर्शक त्रिशूळ-डमरू यांचे चित्र अन्वर्थक असून मुखपृष्ठही अर्थपूर्ण आणि सूचक आहे.

'नाथ संप्रदायाची परंपरा : लोकसाहित्य'
डॉ. धोंडिराम वाडकर
चिन्मय प्रकाशन, औरंगाबाद
पहिली आवृत्ती - २०१३
पृ. ३१२, किंमत रु. ३००/-.

* * *

## वाचकांचा पत्रव्यवहार

बाबूराव चंदावार
सिंहगड रोड, पुणे
दूरध्वनी : ०२०-२४२५०६९३

'नवभारत'ने मे २०१४ चा अंक 'नेहरू-विशेषांक' म्हणूनच प्रसिद्ध केला होता. तो मी वाचला व त्यावर मी माझा अभिप्रायही संपादकांना कळवला होता. नोव्हेंबर २०१४ ला (स्व.) नेहरूंच्या जन्माला १२५ वर्षे पूर्ण झाली. म्हणून 'नवभारत'चा नोव्हेंबर अंकही 'नेहरू-विशेषांक' म्हणूनच प्रसिद्ध केला आहे. तोही मुद्दाम मागवून वाचून पूर्ण केला.

अमिया राव व बी. जी. राव या दोघांच्या 'सिक्स थाउजंड डेज' या इंग्रजी ग्रंथाविषयी श्री. श्री. मा. भावे यांनी लिहिलेला लेख विशेषत्वाने लक्षात घेण्यासारखा वाटला. काश्मिर प्रश्नावर यात प्रकाश टाकला गेला आहे. अर्थात, भारताच्या फाळणीतूनच काश्मिरचा प्रश्न उपस्थित झाला आहे. म्हणून, भारताची फाळणी ज्या विशिष्ट परिस्थितीतून झाली, तिच्याकडे कसे पाहिले जावे, यावर विभिन्न दृष्टिकोणांतून आजवर बरेच काही लिहिले गेले आहे. पण, या










सर्वातून फाळणीच्या कारणांचा सर्वमान्य होऊ शकेल असा कोणताही एकच दृष्टिकोण आजवर पुढे आलेला नाही! कदाचित हे शक्य होणार नव्हते व म्हणूनच ते शक्य झाले नसावे! पण पं. जवाहरलाल नेहरू यांच्या फाळणीच्या धोरणावर व दृष्टिकोणावर त्यांना अप्रिय असे बरेच काही लिहिले गेले आहे. त्यातच (स्व.) डॉ. राम मनोहर लोहिया यांनी अतिशय परखड लिहिले आहे. ते बोचरेच म्हणावे लागेल! कारण, लोहियांनी नेहरू व पटेल या दोघांना 'फाळणीचे गुन्हेगार' म्हणूनच संबोधिले आहे. हे 'फाळणीचे गुन्हेगार' शीर्षकानेच मराठी पुस्तकात आले आहे. या पुस्तकाचे संपादन पुण्याच्याच (स्व.) आचार्य श्रीपाद केळकर यांनी केले आहे.

फाळणीच्या संदर्भात महात्मा गांधींच्या भूमिकेविषयी गैरसमज पसरवण्याचा प्रयत्न राष्ट्रीय स्वयंसेवक संघाने करून पाहिला. पण तो द्वेषमूलक होता म्हणून व्यर्थ खटाटोपच मानला गेला. कारण, महात्मा गांधीच फाळणीला कारणीभूत झाल्याचे रा. स्व. संघाने जनमानसावर ठसवण्याचा प्रयत्न केला होता. तो निराधार असल्याचे पुराव्यानिशी स्पष्ट झाले आहे. (स्व.) प्यारेलाल यांनी 'लास्ट फेज' हा दोन भागांतला इंग्रजी ग्रंथ प्रकाशित केला आहे. त्यातून हे कोणालाही कळू शकणारे आहे. रा. स्व. संघालाही कळले म्हणूनच असेल कदाचित; रा. स्व. संघाच्या शाखांवर महात्मा गांधींना प्रातःस्मरणीय ठरवले गेले असावे!

भारताची फाळणी टाळता येऊ शकली असती किंवा काय, हा एक वादग्रस्त विषय होऊनच अद्याप शिल्लक उरलेला आहे. पण फाळणीचे दुष्परिणाम टाळण्याच्या दृष्टीने जे काही उपाय केले जाऊ शकतील यावर ज्यांनी विचार केला होता, त्यात तीन नावे प्रामुख्याने विचारात घ्यायला हवीत. यातले पहिले नाव (स्व.) डॉ. राममनोहर लोहिया यांचे आहे. कारण यांनीच सर्वप्रथम भारत-पाकिस्तानचा मिळून एकच 'महासंघ' केला जावा, असे सुचवले होते. दुसरे नाव (स्व.) जयप्रकाश नारायण यांचे आहे. यांनी भारत-पाकिस्तान या दोन स्वतंत्र राष्ट्रांचे कान्फेडरेशन (लीग, संयुक्त संघ) करण्याची सूचना केली होती. तिसरे नाव (स्व.) विनोबा भावे यांचे आहे. यांनी ए. बी. सी. या आद्य अक्षरांतली सूचना केली होती. ए म्हणजे अफगाणिस्तान. बी म्हणजे बर्मा - आजचा मॅनमार. सी म्हणजे सिलोन - आजचा श्रीलंका. या तिघांच्या मध्ये येणारी राष्ट्रे - अफगाणिस्तान, भारत, पाकिस्तान, भूतान, नेपाळ, मॅनमार आणि श्रीलंका आदींचा मिळून एकच महासंघ केला जावा, अशीच विनोबांनी सूचना केली होती. ही सूचना केली गेली त्या वेळी बांगला देश अस्तित्वात आला नव्हता. यात सर्व राष्ट्रांचे स्वतःचे राष्ट्रांतर्गत धोरण स्वतंत्र रहावे, पण परराष्ट्र धोरण मात्र सर्वांचे मिळून एकच रहावे, असे सुचवले गेले होते. यावर मी माझ्या 'स्वाधीनता का नवसंघर्ष' या हिन्दी भाषेतल्या ग्रंथात 'उलझी हुई कश्मीर-समस्या' हे प्रकरण लिहिले आहे ('विजया बुक्स', दिल्ली २०११).

काश्मिरचा प्रश्न वस्तुतः भारत आणि पाकिस्तान या दोन राष्ट्रांतलाच मानला जातो. पण आता दक्षिण आशियातलाही तो एक महत्त्वाचा प्रश्न मानला जाऊ लागला आहे. कारण रशिया, चीन ही राष्ट्रेही यात सहभागी होताना दिसू लागले आहे. नेहमीचा चीन-भारत सीमाप्रश्न उपस्थित आहेच. पण, चीनने आझाद काश्मिर सीमेला भिडवून रस्ते बांधलेले असल्यामुळे चीन काश्मिर प्रश्नात प्रवेश करू शकलेला असावा, असे वाटू लागले आहे. तिकडे रशियादेखील पाकिस्तानसीमेच्या निकट असल्यामुळे, त्यालाही काश्मिर प्रश्नात रस वाटू लागलेला असावा, असे अलीकडच्या त्याच्या हालचालीवरून वाटू लागले आहे. तेव्हा, भारताच्या फाळणीतून निर्माण झालेला प्रश्न प्रारंभाला भारत-पाकिस्तानपुरताच मर्यादित वाटत होता, तो आता दक्षिण आशियातला महत्त्वाचा प्रश्न ठरू पाहतो आहे. कारण अमेरिका, रशिया व चीन ही तीन राष्ट्रे जागतिक राजकारणात स्वतःचे वर्चस्व निर्माण करण्याच्या हेतूनेच काश्मिर प्रश्नाचे भांडवल करून घेण्याच्या मनःस्थितीत आलेली असावीत, असे साधार म्हणता येऊ शकते. म्हणून, विनोबांनी म्हणून ठेवले आहे त्यावर विचार करायला हवा! ते म्हणाले होते "भारत-पाकिस्तानचा प्रश्न असो वा भारत-चीनचा असो; राजकीय दृष्टिकोणातून तो सुटू शकणार नाही. राजकारणाने आत्तापर्यंत तोडण्याचेच काम केलेले आहे; ते तोडणेच जाणते, जोडणे जाणतच नाही. यामुळे भारताचे दोन तुकडे झाले. कोरिया, जर्मनी, व्हिएतनाम, बर्लिन आदींचे दोन-दोन तुकडे याच राजकारणाने केले. राजकारण जोडू शकत नाही ते तोडण्याचेच काम करते, हे राजकारण्यांनी

ध्यानात घ्यायला हवे." ('स्वाधीनता का नवसंघर्ष', पृष्ठ ५६, मूळ हिन्दीवरून मराठी अनुवाद माझा.)

याच संदर्भात (स्व.) शेख अब्दुल्ला यांच्याविषयी 'सिक्स थाउजंड डेज' मध्ये जे लिहिले गेले आहे, त्याचा विचार करायला हवा. राजकारण्यांना जी महत्त्वाकांक्षा असते, तीच शेख अब्दुल्लांनाही होतीच! म्हणून त्यांच्याकडून काही प्रमादही घडून आलेच असतील. पण, त्यांना काश्मिरचा प्रश्न सुटावा असेही वाटत होते, असे म्हणता येऊ शकते. कारण, त्यांनी काश्मिर प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी, राजकारणाबाहेरील प्रभावी व्यक्तींशी संपर्क साधला होता. यात जयप्रकाश नारायण व विनोबा या दोघांना ते स्वत: भेटले व त्यांना यात लक्ष घालण्यासाठी विनवलेही होते. शेख अब्दुल्लांच्या इच्छेमुळेच जयप्रकाश नारायण यांनी त्यांना विनोबांकडे पवनार आश्रमात नेले होते. याचे दुर्मीळ छायाचित्र माझ्या हिन्दी भाषेतल्या 'स्वाधीनता और जनआंदोलन' या पुस्तकाच्या मुखपृष्ठावरच दिले गेले आहे (ओमप्रकाश वर्मा उर्फ मुन्नाबाबू यांच्या सौजन्याने 'शरारे प्रकाशन' जनकपुरी, नई दिल्ली, २०१३).

तात्पर्य असे की, काश्मिरचा प्रश्न भारत-पाकिस्तान या कृत्रिम विभाजनातून निर्माण झालेला आहे आणि तो राजकारणाचा दुष्परिणामच म्हणायला हवा! म्हणून मानवीय म्हटले जाऊ शकतील असे सर्वच प्रश्न राजकारणातून सुटूच शकणार नाहीत. यासाठी विनोबा-जयप्रकाश नारायण यांसारख्या मानवतावादी जीवनसाधकांचीच गरज असते व आहे, हेच जाणून घ्यायला हवे!

---

## लेखकांचा परिचय

**कै. डॉ. इरावती कर्वे**

समाजशास्त्राच्या प्राध्यापिका होत्या. समाजशास्त्र विषयक लेखात महाभारतावरील ग्रंथ युगांत हा प्रसिद्ध आहे.

**डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त), गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** व्यंकटेश रिव्हेरा बिल्डिंग नं. बी. फ्लॅट नं. १, शाहू कॉलनी, गल्ली नं २, कमिन्स कॉलेज जवळ, कर्वेनगर, पुणे- ४११०५२ भ्रमणध्वनी : ९४२२०६४९७५

**डॉ. रोहन वेंगुर्लेकर**

यांचा पत्ता आणि फोन नं. लेखा बरोबर आलेला नाही.

**मेधा सिधये**

सहायक मराठी विषयातील Ph. D. असून मराठी नाटकांच्या अभ्यासिका.

पत्ता : १२०४, सदाशिव पेठ, व्यंकटेश अर्पा. लिमये वाडी, पुणे – ४११०३०

दूरध्वनी : ०२०–२४४५३४४९

**प्राचार्य डॉ. पंडितराव पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन.

***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक –४२२ ०१३.

भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

**श्री. बाबूराव चंदावार**

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट-१३, सिंहगडरोड, पुणे-४११ ०३० दूरध्वनी : ०२०-२४२५०६९३

**डॉ. सौ. उषाताई कोटबागी.**

***पत्ता :–*** एम. ए.; एम. फिल.; पीएच. डी. ३५८, सिंध सोसायटी, औंध, पुणे - ४११००७.

भ्रमणध्वनी : ९८८१७३७२७१.

संपर्कासाठी पत्ता : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा) फोन :(०२१६७)२२०००६

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी मन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून मराजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई